# धुकें आणि दहिंवर

## अज्ञाताकडे १

" प्रिय विनय

पत्र मिळाले. वाचून मनाला प्रथम खेद वाटला, पण—"

डोळ्यात तरारून पाणी भरल्यानें मी पेन तसेंच हातात ठेऊन टेबलावर डोकें टेकलें. दिवसभर दाबून ठेवलेले सुप्त व जागृत विचार आता डोक्यात धुडगुस घालीत होते. डोळ्यातलीं आसवें गालावरून ओघळून खालीं ठिबकत होतीं.

ती सारी रात्र नव्हे सारा दिवसही माझ्या हृदयात किती स्पष्ट अंकित झाला आहे. थोड्याशा स्मृतीनेंही भराभर सारा चित्रपट डोळ्यासमोर दिसूं लागतो. आज इतकीं दऱ्या शिखरे चढून आल्यावरही त्या हिरवळीकडे पाहून मनाला थोडी का होईना ओढ लागल्याप्रमाणें वाटते.

विद्यार्थीदशा संपवून आम्ही आता पांगणार म्हणून शेवटच्या सहजीवनाचा पुरेपुर आस्वाद घेण्याच्या हेतूनें पाचसहा मैत्रिणी परीक्षेनंतर थांबलों होतों आणि वनभोजनें, पार्ट्या, बाजार असल्या गोष्टींनीं कार्यक्रम कसा ठासून भरला होता.

सकाळीं विनयचे पत्र आलें. तेव्हां मी नुकतीच आंघोळ करून खोलींत आलें होतें. त्याचे पत्र वाचून माझ्या मनाला केवढातरी धक्का बसला. पण मी माझे मन तात्काळ सावरलें. बाहेर सर्व मैत्रिणी वनभोजनाला जायची तयारी करीत होत्या. " मला माझे विचार मागे टाकले पाहिजेत. सर्वांच्या सुखात माती कालवणें योग्य नाहीं. "

मी पत्र उशीखालीं ठेवलें पण माझे हातपाय गळल्याप्रमाणे झाले होते. मी विमनस्कपणें मच्छरदाणीचा दाडा धरून उभी होते.

इतक्यात प्रभा आत डोकावली.

" उज्वल, उभी काय आहेस. चलायचं नाहीं का ? सगळ्या तयार झाल्या सुद्धा. स्वप्नं पडताहेत वाटत बाईसाहेबाना ? "

मी मान हलवून स्वतःला शुद्धीवर आणले व आरशासमोर जाऊन उभी राहिलें.

हातात कंगवा घेऊन केस उलटे फिरवीत म्हणालें,

" स्वप्नाचे दिवसच आहेत हे प्रभे ! कोश फोडून बाहेर पडायच्या बेताला आहोंत आपण. सार जीवन पुढे पडल आहे.

आपण फुलपाखरं पहातों तेव्हा वाटते काय भाग्यवान आहेत बेटीं. ह्या फुलावरून त्या फुलावर उडावं, मजा करावी, हेच ह्याचं जीवन. पण त्याना निसर्गाच्या हेतूची पूर्ति करायची असते. आपलीं अंडीं देण्यासाठीं तींही योग्य स्थान शोधीत असतात आणि तेवढे कार्य संपल्यावर जगाचा निरोप घेतात.

प्रभे, त्याना जगात ध्येय असत, त्याच्या जीवनाला हेतू असतो. आपल्याला तो तरी आहे का ग ? "

मी भाग काढून केस विचरून केस बाधले व आकडे आत खोऊं लागले.

प्रभा हंसली, " अत्यत आनंदाच्या वेळीं सुद्धा तुला गभीरपणा सोडतो का उज्वल ? "

मी शेवटचा आकडा खोवून, कगव्याचे गुंतवळ काढीत प्रभेकडे वळलें.

" अत्यंत आनंदाच्या वेळींसुद्धा माणसाच्या डोक्यावर दोन शिगें उगवतात का प्रभे ? "

प्रभानें हास्याचे मजले उठवले. इतक्यात खालून अनसूयाने हाक मारली.

" हा उजळ, प्रभे, चला लवकर. ही प्रेम करायची वेळ नाहीं."

" आज्ञा सरकार " प्रभा उठून दाराशीं जात म्हणाली. मी

ओल्या कुंकवाची बाटली उघडून कपाळाला काचेच्या काडीने एक टिकला घाईनेंच लावला, आणि तिच्या मागोमाग बाहेर पडलें.

सारा दिवस आम्ही जंगलानीं हिंडलों, बागडलों, रानबोरं खाल्लीं, नवफुल गोळा करून माळा गुंफल्या.

माझे प्रयत्न यशस्वी झाले. विनयचें पत्र मी पूर्णतः विसरून गेले. सध्याकाळीं परत आल्यावर दहींभात खाऊन फिरून सर्वजणी एकत्र झाल्या. अनसूयेचे लग्न ठरल्याची वार्ता संध्याकाळच्या डाकेने आणली होती. यजमान बॅरिस्टर होते.

पुनश्च हास्याला ऊत आला. थट्टेचे पूर वाहिले.

अष्टमीचा चद्र आकाशात उगवला होता. पिठासारखं चादणं पडल होत. मी गच्चीच्या कठड्यावर बसलें होतें. त्याच्या थट्टेंत मी फारसा भाग घेत नव्हतें आणि माझा स्वभाव थोडा गंभीर असल्याने कोणाला त्यात नवलही वाटलें नाहीं. तिथें बसल्या बसल्या मला तात्यासाहेब कोल्हटकराच्या जुन्या ओळी आठवल्या आणि मी गुणगुणू लागले.

“ आजकाल होति न वश पति असे सये गे आवडती इंग्रजी त्या ढग नवनवे ऽ ऽ ”

माझी ओळ मध्येंच हास्याला खंड पडल्याने मैत्रिणींच्या कानावर पडली. फिरून हास्य कल्लोळ उठले.

“ बरीच आहेस कीं ग ? गंभीरपणाचा आव केवढा आणि असलीं चावट गाणीं तुला कोणी शिकवलीं ? ”

अकराच्या सुमाराला, दिवसाच्या श्रमाने साऱ्या झोपेला आल्या नी आमची बैठक पागली.

मला झोप येणें शक्यच नव्हतें. मी खोलींत येऊन दिवा लावला. विनयचे पत्र एकदा डोळ्याखालून घातले. आतून उचंबळून आलेला निश्वास, ओठ एकमेकावर घट्ट दाबून आतच दाबला आणि पत्र लिहावयास सुरवात केली.

“ प्रिय विनय... ”

एक वाक्य लिहिलें; पण पुढें लिहवेना. डोळे भरून दुथडी वाहूं लागले.

थोड्या वेळाने अश्रू संपून मन हलके झाले. विनयचें पत्र अजूनही माझ्या डाव्या हातात उघडें होतें. उजव्या हातात पेन तसेच होतें. मी पुन्हा एकदा पत्राचा मायना व पहिले वाक्य विमनस्कपणें वाचलें.

माझ्या मनात किती–किती विचार–लहरी उत्पन्न झाल्या. मी विनयचे पत्र समोरच्या कागदावर ठेवलें, नकळत फाउंटनपेन बंद केलें; आणि खुर्चीच्या पाठीवर रेललें.

माझ्या भावनाना आता पूर्ण मोकळीक मिळाली होती; कारण हृदयाची रगभूमी आता रिकामी होती. माझ्या आणि विनयच्या जीवनाचा इतिहास—तें नाटक त्या रंगभूमीवर पुनश्च एकदा रंगत होतें. त्या निःशब्द अगोचर नाटकाची एकमात्र प्रेक्षक होते मी. मला मात्र त्या खेळातला प्रत्येक शब्दनूशब्द ऐकूं येत होता नव्हे दिसतसुद्धा होता.

मी इंटरच्या वर्गात जाईतों विनयचे माझ्या आयुष्यात केवढें स्थान आहे ह्याची मला यत्किंचित् कल्पना नव्हती. ती कल्पना आम्हा दोघानाही एक दिवस अचानक आली. आणि आमचीं आयुष्यें आम्हीं त्याच दिवशीं एका सूत्रात गुंफण्याचा निश्चय केला. त्यानतर विनय आणि मी दोघाचे जीवन आपोआप पूर्णपणें एक झालें. मी त्याच्यापासून दोनशें मैल वसतिगृहात रहात होतें. परतु आमच्या मनात येणारे विचार परस्पराना पूर्ण माहीत होते. विनय तीस साली जेलात गेला; त्यानंतर स्वसुखाचा विचार सोडूनही तो एकतीसपर्यंत कॉंग्रेसच्या चळवळींत काम करीत होता. महात्माजींनीं सप्टेंबरमध्यें ‘ प्राणातिक उपवास ’ प्रारंभ केल्यापासून त्याच्या मनाची कशी तळमळ चालली होती हेही मला ज्ञान होते. पण क्रमशः त्याच्या पत्रातून ही तळमळ कमी होत गेली. आणि मीही तो विषय विसरून गेलें.

देशांत ह्यावेळीं कोणत्याही तऱ्हेची चळवळ नव्हती. विनयचीं

पत्रे थोडीं त्रोटक असली; तरी ' शात ' असत. त्यामुळें आपल्या आयुष्यात इतक्या लवकर एकादें गंभीर वादळ उठणार ह्याची मला यत्किंचितही कल्पना नव्हती.

माझ्या भविष्याबद्दल काहीं आशा—अपेक्षा होत्या. आणि जोडीदार प्रथमच निश्चित झाल्याने मी कितीतरी मनोरे उभवले होते.

जात्याच मला ससारी जीवनाची आवड. आपलें एखादे सुंदर घर असावे, दोन चार मुलें असावीं; मैत्रिणी असाव्या...

आणि मुलाची मला विलक्षण आवड. घरात लहान मूल मी कधीं पाहिलें नव्हते. कुणाचेंही मूल पाहिलें कीं त्याच्यासाठीं अगदी आसासली असायची मी. लहानपणापासूनच मला नेहमी वाटायचं " आपलं का नाहीं एकादं मूल ? "

मी एकदा तर आईला विचारलेही होते " आणि बाळं कुठून आणतात ग ? "

" किनई देवाची तपश्चर्या करावी लागते त्याला."

" ध्रुवासारखी ? "

" हो."

" माझ्यासाठीं केली होतीस तूं. "

" हो तर. म्हणून तर मिळालीस तूं मला."

" आई मी करूं का तपश्चर्या."

" करायचीच आहे. इतकी कशाला घाई ? "

मी मोठी झालें. संसाराचा-जीवनाचा अर्थ मला समजला. माझी मुलाची हौस कमी झाली नाहीं उलट वाढली. माझ्या भावी जीवनात माझ्याभोंवतीं निदान ४-५ पोरं तरी मी नेहमीं चित्रित करीत असें.

विनयला माझें मुलाचें वेड माहीत होतें. तीसमध्यें जेलांतून सुटून आल्यावर तो म्हणालासुद्धां.

" उज्वल, भिकाऱ्याना नाहीं हो मूलं लाभत."

मी हंसूनें म्हणालें होतें " भिकाऱ्यांनाच मूलं लाभतात श्रीमंतांच्याच नशिबांत नसतात तीं."

तो गंभीरपणें उत्तरला होता. " हा झाला निसर्ग. परंतु माणसं बुद्धीनं काम घेतात. आणि ज्याना मुलं पोसायची ऐपत नाहीं त्यानीं त्याना जन्म कशाला द्यायचा ? "

मला तो विषय आवडला नाहीं. विनयचे शब्द बुद्धीला पटले मनाला पटले नाहींत, हे त्याचें कारण असेल. मी किंचित् रुसव्यानें म्हणालें होतें.

" मी मिळवीन आपल्या मुलापुरतें. "

—आणखीसुद्धा किती-किती आठवणी माझ्या मनात येत होत्या. विनय-त्यालाच शोभा देई तें नाव-आई नेहमीं म्हणायची ' विनय देव माणूस आहे आमचा. '

—पण अत्याचाराचा प्रतिकार करण्याची इच्छा जणू काय त्याच्या रक्तात बाणलेली होती. ह्या त्याच्या स्वभावामुळें कॉंग्रेसची चळवळ सुरूं होताच शात मुखदुर्बल किंचित एकलकोंडा विनय त्या चळवळींत हिरीरीनें शिरला. आणि मी त्याच्या कार्याकडे कौतुकाने, आदरानें, आश्चर्यानें पहात राहिले. मनुष्याला ध्येय आणि अनुभव काय शिकवीत नाहींत ? चार महिन्यात विनय पार बदलून गेला होता.

त्याचा एकलकोंडेपणा नाहीसा झाला, आणि अबोलपणाही बहुतेक कमी झाला. विनयच्या स्वभावाला पैलू पडून त्याचें तेज फाकलें. विनयचा सहवास प्रथम शात चंद्रिकेसारखा आनददायी वाटत असे. आता सूर्याच्या उषःकालीन प्रकाशाप्रमाणें उज्वल आणि आकर्षक जीवनदायी होत होता.

हीं सारीं चित्रें माझ्या नजरेपुढून धावलीं. फिरून मला एक हुंदका आला.

खरेंच का हीं मधुर स्वप्नें विरलीं ? का आणि कशीं ? का मी पहातें आहे तेंच स्वप्न ?—पण शक्यच नाहीं विनयचें पत्र माझ्या-समोर होतें आणि हे सगळे अश्रू बाजूला सारून उत्तर लिहिणें अवश्य होतें.

माझ्याप्रमाणेंच विनयच्या मनालाही असह्य यातना झाल्या

असाव्या, हें त्याच्या पत्रावरून स्पष्ट होतें. त्याला सहानुभूतीचे आधाराचे दोन शब्द लिहिणें आवश्यक होतें.

मी उठून सुरईतल्या पाण्यानें डोळे धुतले आणि विनयचें पत्र पुन्हा एकदा वाचावयाला सुरवात केली.

---

## त्याग २

उज्वले,

हे पत्र तुला मिळेल तेव्हा तूं परीक्षा संपवून मैत्रिणींसह खेळण्या बागडण्यात गुग असशील. आणि माझ्या पत्रानें तुझ्या ह्या आनंदात व्यत्यय येईल. हें पत्र पुष्कळ आधींच लिहावयास पाहिजे होतें. परतु मामीनी तुझी परीक्षा सपेतो तुला काहींही न लिहिण्याचें माझ्याकडून वचन घेतल्याने माझा नाइलाज झाला.

गेल्या सप्टेंबरमध्यें महात्माजीनी उपवासाने आत्मत्याग करण्याचा निश्चय केल्यापासून माझ्या मनाची कशी काहिली चालली होती ह्याची तुला ओझरती कल्पना आहे.

रात्रींच्या रात्रीं मी जागून काढल्या. दिवसच्या दिवस अश्रू ढाळले. महात्माजीसारखे पुण्यपुरुप पणाला लावायची पाळी येईतों हिंदू-समाजाने निद्रामग्न असावें ह्याची मला शरम वाटली. आणि आतातरी आपण उठून कामाला लागलें पाहिजे असें वाटूं लागलें. पण कार्याचा आरभ कसा व कुठे करावा हें कळेना.

त्या लोकाच्या दुर्दैवी जीवनाचा मला परिचय पूर्वापार आहे हें तुला माहीत आहे. तथापि त्याचें किळसवाणे जीवन मला कधीं इतकेंसें बोचले नव्हतें. विचार करावयाला लागल्यावर मला त्याच्या अधःपाताची तीव्रता अधीकाधिक जाणवू लागली. खरेंच का माणसें आहेत हीं ? त्याची रहाणी अन्न वसति कशाशींही आपलें साम्य नाहीं. आणि ह्या लोकविलक्षण जगात रहाणाऱ्या त्याची मनोवृत्तीही आपल्यापेक्षा वेगळी असल्याचा मला पदोपदीं अनुभव येई. स्वताचा निपुरता स्वार्थ पहाण्याची त्याची वृत्ति;

मनाची अनुदारता, जुलमाला वाकणारीं त्याचीं मने,—ह्या सर्वच गोष्टींमुळें मला वाटे; हीं आपल्यासारखीं माणस नव्हत.

वानरापासून आजचा मनुष्य उत्क्रात झाला म्हणतात. त्या उत्क्रातीच्या पायऱ्यापैकीं ही एकादी असावी, असेंच मला कितीकदा वाटे. मला त्याची कींव येई. कित्येकदा चीडही. मी त्याच्या जगात नेहमीं फिरत आलों आहें. त्याना शक्य तितकी मदत केली आहे. परंतु त्याच्याशीं मी समरस कधीं झालों नाहीं. पाण्याच्या भाड्यात टाकलेल्या तैलबिंदूप्रमाणें मी पाण्यात राहूनही पाण्याबाहेर राहिलों.

महात्माजींच्या उपवासाने माझे डोळे उघडले. ह्या माणसाचीं जनावरें बनविण्याचें अमानुष काम कोणी केलें? ही माणसा-सारखीं माणसे मातीला कशीं मिळाली? त्याच्यात व आपल्यात ह्या भिती कुणी उभारल्या. उज्ज्वल, हें राक्षसी कार्य आपण, स्पृश्य हिंदू समाजानें केलें.

ह्या पापाचे धनी आपणच आहोंत. पिढ्यान् पिढ्या त्यानी आपल्या समाजाच्या सुधारणेला मदत केली आहे. शतकानुशतके आपली पवित्रता त्यानीं रक्षण केली आहे. आपल्या पावित्र्याचे रक्षण करण्यासाठीं त्याना अमंगळ अपवित्र कामें करावीं लागलीं. त्याची त्यानीं क्षिती बाळगली नाहीं.

ह्या त्याच्या कामगिरीचे समाजानें काय मोल केलें? त्याना आम्हीं वाळींत टाकले. त्याची वसति गावापासून दूर वसवली. त्यानीं अमंगळ कामें उचललीं; म्हणून त्याचे सारे जीवन अम-गळ गलिच्छ केलें. त्याच्या वस्तीला विहिरी लागत नाहींत, रस्ते बाधले जात नाहींत; तर नाल्या कुठल्या? दिवे-ताराचा प्रकाश त्याना पुरतो असे आमचे मत.

आणि ह्या अमंगळ जीवनातून निर्माण झालेलीं अमंगळ माणसं पाहिलीं म्हणजे आम्हीं त्याचा तिरस्कार करतों. त्याच्या स्पर्शानें आम्हाला विटाळ होऊं लागतो. जगाला पावन करणारा पावन आणि पाणी त्याच्या स्पर्शानें स्वतः अपवित्र होतात.

आज हजारों वर्षे हेंच चालत आलें आहे. आणि हा अत्याचार आज धर्म आणि रूढीच्या नावाखालीं आवश्यक होऊन बसला आहे.

ज्या धर्माला, ज्या समाजाला माणुसकीचा गंध नाहीं तो धर्म, तो समाज मृत्युपंथाला लागला; हें निश्चित आहे. काय माझा हिंदू धर्म इतका पतित आहे ? काय माझ्या सनातन हिंदू समाजाची वाढ खुंटली आहे ?

असे तरी कसे म्हणता येईल ? मृत्युपंथाला लागलेले समाज महात्म्यासारखे दैवी पुरुष निर्माण करीत नाहींत.

असे विचार मनात आले म्हणजे माझ्या मनाला आशा वाटू लागे. शिवाय महात्माजींच्या उपवासात व समाप्तीनंतर ज्या जोमानें हिंदू समाजानें अस्पृश्यतेचा शेवट करण्यासाठीं कंबर कसली, तो जोम पाहून आपल्या समाजाच्या नसात रक्त उसळत असल्याची खात्री मला पटली.

ह्या यज्ञामध्यें मीही भाग घेत होतों. देवालयें अस्पृश्याना मोकळीं करण्याच्या कामात आम्हाला बरेच यशही आलें. काही पाणवठे त्याना मोकळे करण्यात आले.

तेवढ्याने मला समाधान वाटेना. हे कार्य किती अपुरे, जणूं शिळोप्याच्या गप्पा. आणि हाच विचार माझ्या मनःक्षोभाला कारणीभूत होत होता.

ह्या वादळातून दिवसच्या दिवस काढल्यानंतर ते वादळ एकाएकीं शात झाले. नवसूर्याचीं किरणें कुठूनतरी अचानक आलीं. माझ्या मनाला दैवी शातीचा अनुभव आला.

माझा मार्ग मला सापडला होता.

उज्वल, माझा मार्ग सेवेचा आहे. तुला माहीत आहे सेवाधर्म हा अत्यंत कठीण असतो. तेथें आपल्या मार्गावर नीट लक्ष देऊन मार्ग आक्रमण करावा लागतो. बाजूला लक्ष द्यायला फुरसत सापडत नाहीं.

ह्या मार्गाचें अवलंबन करणाराला गृहस्थाश्रमाचीं कर्तव्यें

पाळणें अशक्य आहे. सर्वसंग परित्याग करूनच मनुष्य ह्या दिशेला वळू लागतो.

माझ्या मनाचा निश्चय झाला, तरी आपल्या जीवनाला सर्वस्वी नवें वळण लावताना तुझा विचार घेणें मला अपरिहार्य वाटूं लागले. परंतु तुझी परीक्षा जवळ आली असताना तुला निष्कारण काळजींत घालावे का नाहीं ह्याचा निर्णय मला करता येईना. अखेर मामीनींच तो निर्णय केला.

उज्वले, तुला पत्र लिहून मी विचारू शकलो नाहीं, तरी तूं मला माझ्या ध्येयापासून च्युत करणार नाहींस, अशी मला खात्री होती. शिवाय काहीं काही वेळेला, मनुष्याचे अंतःप्रवाह इतके वेगवान असतात कीं, त्याला आपले सोबती काय करतात हे पहावयालाही उसंत नसते. त्या खळाळणाऱ्या प्रवाहाबरोबर त्याला वहाणें प्राप्त असते.

हीच स्थिती माझी होती. म्हणून तुला त्रास देणें मी निरर्थक समजलों. आणि मी अपरीग्रहाची शपथ घेतली. माझे घर व इतर जी काय थोडीशी इस्टेट होती ती राष्ट्रकार्याला अर्पण केली. आणि स्वतालाही जन्मभूमीच्या सेवेला अर्पण केले आहे.

माझी स्वल्प इस्टेट विकून, आपल्या घरापासून २ मैलावर अस्पृश्य वस्तीच्या पलीकडे एक शेत विकत घेतले आहे. आणि त्यातच लहानशी झोपडी उभारून रहायला आलों आहे. त्या शेताच्या काठाला असलेली दोन मोटाची आणि भरपूर पाण्याची विहीर मी येताच अस्पृश्याना मोकळी करून दिली. त्याच्या वस्तींत एक विहीर आहे. पण ती उथळ असल्याने उन्हाळ्यात तळचा गाळ यायला लागतो, आणि बिचारे पाण्यावाचून हैराण होतात. आता त्याच्यावर असा प्रसग येणार नाही.

त्याच्यासाठीं एक छोटासा दवाखानाही चालू केला आहे. त्याना सध्या होमिओपाथिक औषधेच देण्यात येतात. इतरही काम हलुहळूं होत आहे.

सध्या इथे आम्हीं ४–५ जणेंच आहोंत. जसजसा कामाचा व्याप वाढेल, त्या प्रमाणात कार्यकर्त्यांची सख्याही वाढत जाईल.

एक काम मात्र तुझ्यावाचून कोणाच्यानें होणें शक्य नाहीं. त्यामुळे परीक्षा संपवून तूं केव्हा येतेस ह्याची आम्ही वाट पहातों आहों.

इथें एक शिशुमदीर काढणें अत्यत अवश्य आहे. आया कामावर जाणाऱ्या असल्याने मुलाची फार दैना होते. शिशुसगोपनाची त्याना यत्किंचितही कल्पना नाही. अज्ञान आणि दारिद्र्य ही त्याला कारण असलीं तरी बेपर्वा स्वभाव, हा बुडाशीं आहे.

आमच्यापैकीं मुलाबद्दल कोणाला काहीच समजत नाहीं. तुला मुलाची फार आवड आहे. आपल्या मुलाचे कौतुक काय कोणीही करील, आणि सर्वच करतात. तुला समाजाच्या एका मोठ्या भागाचे 'आईपण' निभवावें लागणार आहे. आणि 'उज्वला हे काम उत्तमपणें पार पाडील' असा मला विश्वास वाटत असल्यास काय नवल ?

पत्र फार लाब झालें. बारिक गोष्टी पुष्कळ लिहिता येतील, पण आता तू लवकर येथें येणार आहेस तेव्हा समजतीलच.

बाकी मजकूर काही नाहीं. आयुष्याचे कोडे सुटल्याने व मन कार्यव्यग्र राहिल्याने, मी पूर्ण समाधानात आहे.

तूं शक्य तितक्या लवकर परत येशीलच.

तुझा
विनय.

ता. क. माझ्या पत्रावरून मी भगवे कपडे धारण करून सन्यासी झालों आहे, अशी कल्पना नको करून घेऊस. मी होतों तसाच आहें. बाह्यवेशावर आतले अंतःकरण अवलंबून असते असें मला वाटत नाहीं.

विनय.

मी पत्र सपवून घडी घालून त्याच्या पाकिटात घातलें; नकळत पाकिट खालीं ठेवलें; आणि एक निश्वास टाकला.

बाहेरचें जग शात झालें होतें. क्वचित कुत्र्याचे भुंकणें आणि रखवालदाराच्या आरोळ्या त्याखेरीज कसलीही चाहूल येत नव्हती. किती एकाकी आणि उदास वाटली सारी सृष्टी मला. 'सुखाचे सोबती सर्वच असतात—दुःख मात्र एकटें-एकाकी असतें' हे कुठेंसे वाचलेलें वचन मला आठवलें नी त्याची सत्यता पटली.

मी विनयला लिहावयास घेतलेले पत्र पुढें ओढले. आणि त्याच्यावर लिहिलेलें अर्धवट वाक्य एकदा वाचले. पण ते वाक्य लिहिणारी उज्वला व आता वाचणारी उज्वला ह्याच्यात काहींच साम्य नव्हतें; कारण मला ते वाक्य किती परके, किती निरर्थक वाटले.

मी तो कागद फाडून चिंध्या केला व कचऱ्याच्या टोपलीत टाकला. नव्या कागदावर पुनश्च सुरवात केली.

प्रिय विनय,

पत्र मिळाले. मजकूर समजला. तुझे पत्र बरेच महत्त्वाचें आहे. परतु ते कितीही महत्त्वाचें असले तरी माझ्या उत्तरावर कोणताही निर्णय अवलबून नाहीं. तेव्हा तुझ्या पत्राचें सविस्तर उत्तर देण्याची आवश्यकता नाही—नव्हे तशी शक्यताही ह्या वेळीं नाहीं.

मी आणखी एका आठवड्यात घरीं परत येतें आहें मग आपण काय बोलायचे तें बोलू.

माझे पेपर्स ठीक गेले आहेत आणि वेळही मैत्रिणीच्या सहवासात ठीक जात आहे.

नवल विशेष भेटीअंती

तुझी

उज्वल

पत्र पुन्हां न वाचताच मीं पाकिटांत कोंबलें. आणि विनयचा पत्ता त्यावर घालून बंदही केले.

पत्र बंद केलें तरी माझ्या विचाराचा कप्पा बंद करणें कसे शक्य होतें ?

# दादा ३

सगळ्यात धाकटी, शिवाय एकुलती एक मुलगी आणि प्रौढ वयात आलेली ह्या सर्व कारणानीं मी घरात सर्वांची फार लाडकी होतें. अजूनही घरीं गेले म्हणजे पुष्कळदा रात्रीं आईच्या कुशींत निजण्याचा हट्ट करी मी. नी मग आई हंसून म्हणे,

" मंजु लहान का ग तू आता ? "

आई नि आजोबा मला नेहमींच मंजू म्हणत असत. कारण मजुळाआत्या मेल्यानतर माझा जन्म झाला. आई कितीतरी आठवणी सागायची जुन्या. नी किती गोड वाटत त्या !

महेशदादा नी मंजुळाआत्या दोघाचाही जन्म बरोबरचा. आजीचे शेंडेफळ आणि आईचे पहिलेवहिले बरोबरच आलीं दोन्ही. आई सारी १३ वर्षांची होती तेव्हा. झोप पुष्कळ, अंगात धडपड व व्रात्यपणाही पुष्कळ. अंगावर दूध पुरेसें यायचें नाहीं. येईल तें धड पाजायची उती नसायची. मूल तासनतास रडलं तरी तिला त्याची करुणा वाटायची नाहीं. बाबा होते अठरा-एकोणीसचे. त्याना तिचा हूडपणा पाहून शरम वाटे. ते तिला नेहमी हळुहळूं रागावत–समजाऊन सागत.

आजीनीं मात्र मुलाला काहीं कमी पडूं दिलं नाहीं. आत्याबरोबरच ती त्यालाही अंगावर घेई. तिच्याबरोबरच त्याच ती करायची सारं.

कुणी म्हटलं म्हणजे म्हणायची " पोरीचीच जात आहे ती तरी. देवाला काय घाई होते कोण जाणे ! आता काहीं नडल का होतं इतक्यात ? खेळायचे दिवस तिचे हे. "

महेश आणि मंजू आजीनें वाढवले. दोन वर्षांनीं माधव झाला आणि दोन वर्षांनीं मोहन. पण आई तोंवर पुष्कळच 'निवळली' होती.

आत्या नऊ वर्षांची असताना आजी वारली. आईला ह्या तीन मुलानंतर मूल कित्येक वर्षे नव्हतें; त्यामुळें तिची मुलीची हौस अपुरी

राहिली होती. आत्या तिला नणदेप्रमाणें वाटली नाहीं कधीं.

आत्याचे लग्न झालें—तें काहीं आईने आजीची कमतरता कुठें भासूं दिली नाहीं. आजोबाना आजीची आठवण येऊन त्याचे डोळे वारंवार ओलावत. पण तेही सारखे म्हणत,

" पोरी, आईसारखी भावजय मिळाली तुझ्या नशिबानीं. देवानीं केव्हाही बोलावलं तरी काळजी नाहीं मला तुझी. "

आईने त्याचे शब्द ऐकले म्हणजे ती सागायची,

" मंजूची काय—माझीच आई गेली मला टाकून. त्याच्या प्रेमाचं ऋण आहे तेवढं माझ्या डोक्यावर. "

आजीबद्दल नि आजोबाबद्दल बोलताना अजूनसुद्धा आईचे डोळे ओलावतात पुष्कळदा.

आत्याचे लग्न झाले. घर चागलें मिळालें. माणसेही सज्जन मिळाली. सर्व ' सायसंगीत ' होतें. पण आत्याच्या " नशिबात भोगायचे नव्हते. "

विनय तिला सतराव्या वर्षी झाला. बाळंतपणाचा पण तिने हसत जिंकला. पण सहावे दिवशीं रात्रीं तिला फणफणून ताप भरला. तापाचे कारण कुणाला समजलें नाहीं. औषधे सुरू होतीं. उगीच " द्वाड " कल्पना कशाला, म्हणून बाराव्या दिवशीं मुलगा पाळण्यात घालून नाव ठेवलें.

पण ' द्वाड ' कल्पना टाळून थोड्याच टळतात ? सृष्टि आपल्या नियमाप्रमाणे कार्य करीत असते. पंधरा दिवसाचा मुलगा आईचे अंगावर टाकून, आत्या परलोकीं निघून गेली.

आईवेगळं पधरा दिवसाचं पोर. त्याला वाढवणं म्हणजे केवढं कष्टाच काम. अर्थात् त्याच्या घरच्या माणसानीं त्याला नेला नाहीं. पुढच्या वर्षी दादाच्या वडलाचं दुसरें लग्न झालें. ते साहजिकच होतं. त्याना दुसरेपणाचा नुसता डाग लागला होता. सावत्र आई घरात आल्यावर, त्याला घरीं कोणीं पाठवला नाहीं. आणि त्याच्या घरच्या मडळींनीं त्यावर जोरही दिला नाहीं. जरा समजता झाल्यावर तो दरवर्षी उन्हाळ्याच्या सुटींत मात्र घरीं जाई.

मी एक दिवस अचानक ह्या जगात पाऊल टाकलें. आई केव्हा केव्हा तोही प्रसग सुंदर सागते. मला पुष्कळदा वाटतं आठवणी लिहाव्या तर स्त्रियानींच.

विनयची रोजची संवय असे कीं सकाळीं—पहाटेच—आई आणि बाबाच्या बरोबर चहा प्यायचा. आई उठताच हा उठून बसायचा नी ह्याची बुलबुल सुरू व्हायची.

त्या दिवशीं तो उठला तो खोलीत अंधेर. अंथरूण चाचपडलें तों आई नाहीं.

"आई, आई, आई गऽ" उत्तर नाहीं.

रावसाहेब उठले. स्वैंपाकघरात आले. तिथें शेजारच्या आजीबाई विस्तव फडकीत होत्या. न्हाणींतही कोणी सापडलें नाहीं. तेव्हा परत येऊन स्वैंपाकघराच्या दाराशीं उभा राहून मुसमुसायला सुरवात केली.

"आई, ए आई."

इतक्यात बाबा आले.

"काय झालं विनू रडायला ?"

"आई कुठय."

"वेड्या लहान का तूं आईसाठीं रडायला ?"

त्यानीं त्याला उचलून घेतला व आईकडे नेला.

आई बाजेवर निजली होती. नि डोक्यावर पालथा पदर घातला होता. त्याला काय वाटलं कोण जाणे. त्यानें पुन्हा रडायला सुरवात केली.

"विनू रडूं नको राजा. तूं बाळ पाहिलंस का ? तुला किनई बहीण झाली आहे !" आत्याच्या मृत्युनंतर, इतक्या वर्षांनीं मुलगी झाली. तेव्हा आई व आजोबाना वाटे मजूच पुन्हा आपल्या घरीं आली आणि म्हणून दोघंही मला मंजूच म्हणत.

लवकरच मी व विनूदादा मोठे दोस्त झालों. माझ्यापेक्षा मोहनदादा सोळा वर्षांनीं मोठा होता. मला आठवतं तसे हे तिघंही प्रथम शिक्षणानिमित्त आणि मग नोकरीसाठीं बाहेरच असत.

उन्हाळयाच्या सुटींत घराचं लग्नघर करण्यापलिकडे त्याची आमची घसट होत नसे.

सुखाच्या दिवसाना अंत हा असतोच. चालत्या गाड्याला खीळ घालायची निसर्गाला किती आवड !

अठरा साल एन्फ्लुएंझा घेऊन आले. आमच्या घरातून त्याने दोन बळी घेतले. प्रथम उमा वहिनी वारल्याची तार महेशदादा-कडून आली.

घरात सारी मंडळी आजारी होती. पण त्यापैकीं घाबरण्या-सारखी स्थिती कोणाची नव्हती. आजोबाचा ताप जरा जास्त होता इतकंच. आणखी ४ दिवसात बाबा एकाएकीं जास्त आजारी झाले. त्याचीं दोन्ही फुफ्फुस खराब झालीं.

एका आठवड्यात बाबा अचानक आम्हाला सोडून गेले. वेळ रात्रीची होती. आम्हा मुलाना सकाळीं उठल्याबरोबर शेजारच्या घरीं नेण्यात आले. आम्हीं अगदीं घाबरून गेलों होतों. आईचे रडून सुजलेले डोळे—तिचे पुसवटून गेलेलें कुंकू—आजोबाचे भकास तोंड—सगळयाचा अर्थ समजण्याइतकी मी मोठी नव्हते. पण माझं मन घाबरून गेले होते. विनूदादाही रडत होता.

...मडळी आली आणि गेली. बाबाच्या वाचून घर सुने झालें तरी इतर कोणताही फरक आमच्या जीवनात झाला नाहीं.

आजोबानीं मात्र हाय खाल्ली. त्याना हंसताना मी त्यानंतर कधीं पाहिलं नाहीं. पानावर बसून त्यानीं आसवं गाळलीं नाहींत असं कधीं झालं कीं नाहीं देव जाणे. प्रत्येकजण आपल्यापरीनं त्याना समजावी, पण ते म्हणत.

" फुलासारखी पोर गेली, तेव्हा गिळून घेतलं सारं मी. आता पहाडासारखा मुलगा गेला. आता काय समजाऊ मनाला. त्याचे हात माझ्यावर पडायचे ते मी माझ्या हातीं त्याच्या गोवऱ्या रचल्या ! जितक्या लवकर जाईन तेवढा बरा. पण काय नशीबात असेल ते खरं !

फार वैतागले म्हणजे आई समजूत करायला जाई. " असं

जिवाला त्रासून कसं चालेल. आपला मुलगा गेला म्हातारपणीं डोंगराएवढं दुःख झालं सगळं खरं. पण आपण माझ्याकडे पहा. मला तरी आपल्यावाचून कोण आहे ? चाळीशीपासून पुढें सगळं बाकी आहे त्यात गळ्यात ही नखाएवढी पोर आहे. "

" तुझं माझ्यावाचून काय अडणार आहे. तुझीं मोठालीं मुल आहेत, प्रेमळ आहेत, आज्ञाधारक आहेत. "

" त्याच्या दाराशीं उभी राहिले म्हणजे काय करतील ते खरं. मोठाल्या घरदाराच्या सुना आल्या, म्हणजे त्याना सासूची परवा काय वाटणार, आपणच आपली पायरी समजून राह्यल पाहिजे.

आईच्या गोड शब्दानी आणि प्रेमळ सेवेनी त्याना वेड लागू दिल नाहीं, येवढच. पण त्याच्या शोकाला ओहटी कधीं लागली नाहीं. त्या शोकानें सहा वर्षे झिजून आजोबाही आम्हाला सोडून गेले.

मरण्यापूर्वी त्यानीं महेश, माधव आणि मोहन तिघानाही बोलावून आणले. आमची इस्टेट होती ती आजोबा व बाबा ह्याच्याच कमाईची होती. ती इस्टेट माझ्या नावानें करण्याची इच्छा दर्शविली. तिघेही मिळवते होते. इस्टेटही फार नव्हती. त्यामुळे इस्टेट माझ्या नावाने करून आईला त्यानीं माझी पालक नेमली. विनूदादाच्या नावानेही एक दोन शेत आणि थोडीशी रोकड ठेवून त्याच्या घरच्या मडळीनीं त्याला आजोळीं ठेवल्यास शिक्षणाची व्यवस्था करून ठेवली.

अशा रीतीनें आजोबानीं जगातून जाताना आईला पूर्ण आर्थिक स्वातंत्र्य दिले. आईच्या स्वाभिमानी वृत्तीला त्यामुळें धक्का बसण्याचा प्रसंग कधीं आला नाहीं.

विनूदादाचा स्वभाव पहिल्यापासून थोडा विचित्र. आईवर त्याचे विलक्षण प्रेम. सदैव तिच्या पदरात घोटाळायचा तो. हट्ट करण्याचा त्याचा स्वभाव नव्हता. खाण्यापिण्याच्या खोड्या नव्हत्या.

' साधू माणूस आहे आमचा विनू. ' आई नेहमीं म्हणायची. आणि खराच देवमाणूस होता तो. कपडे कसेही असले तरी त्याला चालत. लोभ त्याला कधीं वाटतच नसे.

उघडा भिकारी थंडीनं कुडकुडताना पाहिला कीं अनेकदा आपले कपडे देऊन स्वारी घरीं कुडकुडत यायची आणि मग आई त्याला रागवायची. पुष्कळदा मुलं किंवा वृद्ध ओझीं वहाताना पाहिलें कीं हा त्याना हात देऊन यायचा.

त्याला वाचनाचा नाद थोडा होता. पण जें काय वाची तेंही धार्मिक वाङ्मय. मला आवड शास्त्रीय पुस्तकाची तर त्याला तीं मुळींच आवडत नसत.

...ह्या सगळ्या गोष्टी माझ्या थकलेल्या त्रस्त मनासमोरून अंधुकपणें सरकत होत्या. माझे डोळे जळत होते; मेंदूही तापला होता. आतली आग असह्य झाली म्हणजे निःश्वास टाकून थंडावा आणण्याचा मी प्रयत्न करी.

बाहेर कुठेंतरी दूर पडलेले तीनचे टोले मी ऐकले. मन फार अस्वस्थ वाटल्याने उठून बाहेर गॅलरींत आले. सकाळचा सुख-दायी समीरण सुरु होत होता. माझ्या मनावर त्याची गुंगी चढली. काहीं वेळ तिथें उभी राहिल्यावर डोकं जड झाल्यासारखं वाटून मी परत येऊन अंथरुणावर पडले.

हळुहळू निद्रा माझ्या डोळ्यावर येऊन बसली. परतु माझी झोंप गाढ नव्हती. मला न जाणे काय काय स्वप्ने पडत होतीं. विनयला संतापून पत्र खरडून मी माझ्या मनाचे भाव व्यक्त केले असते तर कदाचित् सारी मळमळ निघून जाऊन बरें वाटलेंही असते. परंतु अविचारानें काहीं लिहिणें मला योग्य वाटत नव्हते. शिवाय जेथें माझ्या शब्दाला मनाला किमत नव्हती तेथे आपले भाव उघड करून कमीपणा पदरीं घ्यायला माझें स्वाभिमानी मन तयार नव्हते. म्हणून साऱ्या जखमा झाकून ठेऊन, मी साधेंच पत्र खरडलें होतें.

...मी खडबडून जागी झाले; तों सकाळच्या पाचाचे ठोके कानावर आले. स्वप्नाचा त्रासिकपणा अजून माझ्या मनावर होता. तो घालवण्यासाठीं मी पुनश्च लोळले. पण स्वप्नात विनयने उच्चा-रलेले शब्द माझ्या कानावर स्पष्ट येत होते.

“ हं उज्वल. पटला दादासाहेबाचा साधूपणा ? मला त्यांचीं

सोंगं ढोंगं पुरीं माहीत होतीं. आता तुलाही त्यानीं फसवलं. आता तरी डोळे उघडूं दे."

---

## आई ४

"थाव, पायावर पाणी घालूं दे."

आईनें भाकरीचा तुकडा ओवाळून टाकला व माझ्या पायावर पाणी घातलें. मी आत येऊन तिला नमस्कार केला.

"किती गळली आहेस अगदीं." आईच्या मायेनें ती म्हणत होती.

"चागला ताप आला ना दोन दिवस" मी तिच्या मागोमाग घरात जात म्हणाले, बसण्याची शक्ति मला वाटत नव्हती. मी माजघरात जाऊन झोपाळ्यावर अंग टाकलें.

आईनें लागलीच अंथरुण पसरुन दिले. आणि ताब्यात पाणी आणीत म्हणाली.

"इथल्याच मोरींत चूळ भरून टाक; नी चहा घे. म्हणजे थोडी हुशारी वाटेल तुला."

मी चूळ भरली. प्रवासानें मळलेले कपडेही बदलले. चहा घेतल्यावर मला जरा बरें वाटलें. आई माझ्या अंथरुणाच्या कडेला बसली होती, तिच्या पदराशीं मी खेळत होतें.

"मऊ भात खाशील आता?"

"नाऽऽहीं" मी रुसव्यानें म्हणाले.

"नाहीं? मग काय खाणार आहेस?"

"काहीं नाहीं. तूं इथून जाऊं नकोस" आईनें हंसून माझ्या कपाळावर हात फिरवला. मी तिच्या मांडीवर डोकें ठेवून दोन्हीं हातानीं तिच्या कमरेला विळखा घातला.

आधींच शेंडेफळ, त्यात उतार वयात अनपेक्षितपणें हातीं आलेलं. त्यामुळं 'लाडं झालं वेडं; गुळं झालं बोबडं' अशीच अवस्था होती माझी. बोलताना सगळे शब्द अधर बोलायची

सवय होती मला. ड ळ र हीं व्यंजनं मला अगदीं परकीं वाटत. ह्याचें काम मी बहुधा 'य्' नीं करायची. आई कौतुकमिश्र थट्टेनें मला कधीं कधीं 'लाडूबाई' म्हणायची. आणि मैत्रिणी 'लायूबाई.'

थोड्या वेळानें कमरेचे हात आईनीं बाजूला केले; आणि हंसत म्हणाली,

" लाडूबाई, आता लोक हसतील तुला! यंदा B. A. होणार ना तूं ? "

" आम्ही नाहीं जा "

" बर नाहीं तर नाहीं. पण काय खायचं ते तर साग. साबूदाणा देऊं का भात ? "

—आई मला मऊ भात मेतकूट कालवून देत होती. मी अंथरुणावर पडल्यापडल्या तिच्या त्या जीर्ण हाताकडे नकळत पहात होतें. ह्या हातानी खस्ता खाऊन आपली बाग फुलवली होती. मी मध्येच तिच्या तोंडाकडे पाहिलें. स्निग्धतेखेरीज दुसरा कुठलाच भाव मला तेथे आढळला नाही.

आई मला विचारीत होती " कशानीं आला ग येवढा ताप "

" आदल्या दिवशीं वनभोजनाला गेलों होतों. रात्रींही निजलें पुष्कळ उशीरा. सकाळीं जागी झाले तों डोक जड वाटलं. पण चहाला जायचा कार्यक्रम होता म्हणून तशीच धडपड करीत उठले. इतक्यात प्रभा आली.

" ताप आहे का उज्वल तुला ? डोळे कसे लाल वाटताहेत. तोंडही लाल दिसतंय " तिनं आग पाहिल तर चागलं गरम होतं. डॉक्टर आले उन्हाचा आहे म्हणाले.

परवा ताप उतरला. पण घरीं यायची अशी घाई झाली होती म्हणतेस. मला सारखं वाटत होतं तुला तार करावी. "

दुपारभर झोंपून काढल्यावर संध्याकाळच्या चहानंतर मला हुशारी वाटूं लागली. शक्यतर विनूदादाकडे जाण्याचा विचार प्रथम मनांत आला.

इतक्यात आई म्हणाली, " विनूला घातलं होतंस का पत्र ? "

' नाहीं ' मी एकेरी उत्तर दिले.

' जरा उन्हं उतरलीं म्हणजे आपण आश्रमात जाऊं या ' आई शातपणें म्हणाली.

मला जरा आश्चर्य वाटलें. माझ्या व विनयच्यामध्यें उत्पन्न झालेले नाजुक धागे तिंने मातेच्या प्रेमळ अंतर्दृष्टीने पाहिले होते, आणि बहुधा आपला मनोमन आशीर्वादही आम्हाला दिला होता. दादाचा हा संन्यास तिला आवडला होता का ? त्याच्या त्यागाला तिची सहानुभूति होती का ? त्याच मार्गाने मीं गेलें तर तिला तें पटेल का ?

मी माझे प्रश्न बाजूला ठेवले. नाजुक ताराना हात लावताना मनाला थोडी भीति वाटते.

मार्चची अरसिक नीरस सध्या विश्वाच्या महाद्वाराशीं उभी होती. तिच्यात उमलत्या पुष्पाची कोमलता नव्हती, किंवा यौवनाच्या चुबनाचा मदही नव्हता. किंचित उमलून गेलेल्या फुलाप्रमाणे तिचे मुख मल्ल भासत होते.

भास्वानानें फेकलेला गुलाल खेळकरपणे उचलून अंगाला लेप करणारे मेघ आकाशात कुठेच नव्हते. त्यामुळें पश्चिमेचें मुख रक्तवर्ण दिसण्यापेक्षा श्वेतपीत किंचित् विवर्ण वाटत होते.

उन्हाच्या झळा नसल्या तरी वाऱ्याची झुळुकही नव्हती. वातावरण निस्पृह मृतवत भासत होतें.

मी व आई धमनींतून—विनयच्या आश्रमाकडे जात होतों. रस्ता चागल्यापैकीं होता. पण नगरसभेच्या अपेक्षित निष्काळजीपणामुळें गिही उखळून निघाली होती. गाडीच्या धावा लोखंडी असल्यानें लहानमोठ्या दगडावरून चाकें जाताना आतल्या माणसाचे अंग घुसळून निघे. एकादा खड्डा थोडा मोठा असला म्हणजे एक गचका बसे; आणि हाड तुटल्याची शंका येई. आई नकळत म्हणे ' अग बाई ग ' मला थोडे हसूं येई.

—आश्रमात आम्ही पोंचलों तों सूर्यास्त होऊन दिवेलावणी

झाली होती. आश्रमाची जागा मला निसर्गरम्य वाटली. दारापाशींच दोन बकुलवृक्ष उभे होते. आतही कडुनिंबाचीं कांहीं झाडे होतीं; आणि आम्रवृक्षही बरेच होते. आश्रमाची जागा काहीं फार मोठी वाटली नाहीं. पण तिच्यामध्यें व्यवस्थित अंतर सोडून वेळूच्या सोनेरी झोंपड्या संधीप्रकाशात सुंदर दिसत होत्या.

" एकादा नदीतटाक जवळ असता तर ? " मी मनाशींच म्हणालें. इतक्यात एका बाजूनें विनयचा आवाज आलासा वाटल्यानें मी त्या बाजूकडे वळलें. तों तिकडून एका गृहस्थाबरोबर बोलत येत होता. माझ्या शरीरातून वीज चमकून गेली. क्षणभरच मी डोळे मिटून घेतले; आणि नतर स्वताला सावध केलें.

तो होता तसाच अजूनही होता. त्याच्या मुखावर शाती स्पष्ट प्रतीत होत होती. त्याचे शुभ्र कपडे त्याच्या गोऱ्या शरीराला शोभून दिसत होते. त्याचा बंगाली शर्ट माझ्या कलादृष्टीला बावळा वाटला, पण—

विनयचें लक्ष आमच्याकडे जाऊन तो धावत आमच्याकडे आला. जुन्याच पद्धतीनें त्यानें माझे हात हातात घेतले. त्याच्या स्पर्शानें अंधेरी येतेसे मला क्षणभर वाटलें. तो स्नेहभरानें विचारीत होता.

" उज्वल, इतकी वाळलीस कशानीं ? आजारी होतीस ? " मी नुसता होकार दर्शवला.

" घरीं तर कळवायचंस "

" कशाला ? आईला घाबरून सोडायला ? "

" जशी काहीं आईच एकटी आहे घरीं ? "

" कोण आहे आणखी ? संन्यास घेऊन जग सोडून उठलेल्या माणसाला, ह्या सासारिक गोष्टींचा व्याप कशाला ? " मी शांतपणें म्हणालें.

" चागली कल्पना केलीस माझ्याबद्दल ! बरं झालं मी तुला आधींच लिहिलं होतं म्हणून. नाहींतर मला भेट म्हणून भगवी कफनीसुद्धा आणली असतीस. " त्याचा स्वर मृदु व नैसर्गिक होता. त्याच्या शब्दांनीं मला पुष्कळच शांत वाटलें.

आम्ही त्याच्या झोपडींत जात होतों. तो आईला सागत होता "मामी तुम्ही दोघी इथं रहायला या आतां. आबे लागले आहेत त्याची उस्तवार करायला तर कुणी हवं."

आई गंभीरपणानें म्हणाली "घराचीं दारं बंद करून मोऱ्याचीं भोकं बुजवायचे उद्योग तुझे."

विनय हंसला "तसं होत खरंच काहींसं. माणसाला दारातून जाणारा प्रचंड ओघ दिसत नाही, जाणवत नाहीं.—"

त्याच्या खोलींत एक समई मंद प्रकाश देत होती. त्यानें समई वरच्या काडीनें कोजळी झाडून वात पुढें सारली. आईनें हात जोडून दिव्याला नमस्कार केला, आणि सध्याकाळची प्रार्थना पुटपुटू लागली.

दादाची खोली होती लहानच, आणि तीही सगळी रिकामी. जमिनीवर एक चटई पसरलेली होती आणि तिच्या उशाला एक बैठा टेबल. ह्या टेबलापाशींच समई जळत होती. दाराच्या समोर भितीला महात्मा गाधींचा मोठा फोटो टागलेला होता. त्याच्यावरची माळ अजून फारशी सुकलेली नव्हती.

सर्व मंडळी चटईवर बसली. विनय म्हणत होता "उज्वल, हे माझे सहकारी विश्वभरबाबा. विशेष म्हणजे हे स्वता हरिजनच आहेत. ते सुंदर कीर्तनं करतात. त्याचं हरिजन वस्तींत दाडगं वजन आहे."

विश्वभरबाबा हंसले "आईना मी पुष्कळदा पाहिलं आहे. आईनीं नसेल मला पाहिलं. गरीब माणसाची इतकी पोच कुठं?"

मी विषय बदलीत म्हटले "पुष्कळ काम करावं लागत असेल. पाहिली पाहिजे तुमची वस्ती एकदां."

"हो हो अवश्य या एकदा. आपल्या सारख्याचे पाय आमच्या वस्तीला लागायचे म्हणजे पूर्वजन्मीचं पुण्यच."

"हे तपस्वी महाराज तुमच्यासाठीं इथें येऊन बसले आहेत!" मी विनयकडे पहात विश्वंभरबाबाना म्हणालें,

"त्यांचा त्याग तर फार मोठा आहे. परमेश्वर त्यांना त्याचा मोबदला दिल्यावांचून रहायचा नाहीं."

"बाबा आज हजारों वर्षे जीं पापं केली तीं फेडायला पाहिजेत ना? आम्हीं काहीं तुमच्यावर उपकार करायला का येतों?"

"तें सगळं तर खरंच हो. पण आम्ही माणसंही हिसाडंच. आमचीं घरं तिथली घाण बेपरवाई पहा. काय ब्राह्मणानीं का सांगितलं घाणेरडं रहायला आम्हाला? भाकरीचे तुकडे साऱ्या दिवसभर मोडावे, ह्या त्या कोनाड्यानीं खरकटं टाकावं—संस्कारच वाइट आहेत आमचे आई."

मला अस्पृश्याच्या वस्तीचा काही अनुभव नव्हता. आई मात्र म्हणाली, "आग झाकायला धड कपडा नसतो अंगावर. घरा-घरानीं फिरून भाकरीतुकडा त्या फाटक्या पदरात बांधून आणतात बिचाऱ्या. नी घरीं नेल्यावर कसल खरकटं नी बरबट. ब्राह्मणाना आपले आचार विचार झाले आहेत डोईजड. तुम्ही त्या गरीबाच्या डोक्यावर ते आता लादा झालं."

तिच्या शब्दाचें आम्हा सर्वांना आश्चर्य वाटले.

"मग तसे घाणेरडेच का राहू देणार सारे लोक आई? ह्या गलिच्छपणानी रोग किती लवकर लागतात. कॉलरा आला कीं पाहिल्यादा ह्या लोकाना धरतो."

"ते सगळं खरं. पण तन झाकायला कपडा नाही नी पोटपुरेशी भाकरी मिळत नाहीं. त्यानीं नाहीं वाटत माणसं मरत. उपास-मारीनीं माणसाच सत्वशोषण होतं. आणि उरलेले सापळे रोगाच्या आहारीं जातात."

"आई, तुमचं म्हणणं खर आहे. पण जे होईल ते तर माण-सानीं करीत असावं? तुमच्या बायका घर कशीं आरशासारखीं ठेवतात. आमच्या बघा एकदा. वेळ सापडला कीं लागल्याच कैकाडणी भांडायला."

"मला नाहीं तुमची नवी सुधारणा समजत. मला दिसतं ते समजतं. मंजूच्या लहानपणीं एक म्हारीण आमचं अंगण झाडा-यची. आठवड्यातून एकदा मी तिला भरपूर अन्न देत असें. त्या दिवशीं पर्वणी वाटायची तिला, म्हणायची बाई चागलं अन्न आम्हाला कोण देतं. उष्टं—नासकं आमच्या नशीबाला येतं."

आमच्या ओळखीचा एक मारवाडी यात्रेला जाऊन आला. तिथून मेल्यानीं प्रसादाच्या पुऱ्या आणल्या. उन्हाळ्याचे दिवस. त्याना आला फुला. मग प्रसाद राहिला बाजूला; त्या टाकल्या म्हारणीच्या पदरात. तिनीं घरीं आणल्या—नी विस्तवावर शेकून सर्वांनीं खाल्ल्या.

रात्रीं जुलाब अन् उलट्या. तीच त्यातल्या त्यात बरी राहिली. दुसरे दिवशीं सकाळीं आली आमच्याकडे.

मंजूचे वडील होते तेव्हा. त्यानीं तिला सागितलं दवाखान्यात जा. पण ती म्हणाली "माणस विष घालून मारतात तिथें मी नाहीं जात."

आम्हीं काही कार्ट्यामेट्या दिल्या. तिचा नवरा नी एक पोरगा जगला. दोन पोर दुपारला गेलीं.

तुम्हाला जर गरीबाची इतकी कींव येत असेल तर त्याच्या पोटाला घासभर अन्न द्या—

---

## ओनामा ५

मी आश्रमात रहावे हें आईला मुळींच पसत नव्हते. दादानें सन्यास घेतला होता. त्यात माझी भर तिला दुःखदायक वाटणे नैसर्गिक होते. पण...

मी पुष्कळ विचार केला. विनयबद्दल मी माझ्या भावना स्थिर केल्या होत्या. तथापि अंतरातली ओढ मला आवरता येईना, नव्हे ती उलट वाढतच होती. विनय मानवतेची सेवा करीत असताना, त्याच्या हातात हात घालून काम करणे हें माझे कर्तव्य नव्हतें का?

माझा निश्चय झाल्यानंतर आईनें मूक संमति दिली; इतकेच नव्हे तर, ती स्वताच माझ्याबरोबर आश्रमात रहावयाला आली. दादाच्या झोपडीजवळ एक छोटी झोपडी आमच्यासाठीं उभारली गेली...

आश्रमाचें आयुष्य मला प्रथम नवीन व थोडें परकी वाटलें.

आश्रमांत दादाशिवाय त्याचे दहा सोबती रहात होते. ह्या सर्व मंडळींनीं १९३०–३१ मध्यें सत्याग्रहात भाग घेतांना घराचे पाश तोडून टाकले होते. आणि आज चळवळ संपल्यावर, महात्माजींच्या कथनानुसार हरिजन सेवेकडे आपलें मन वळवलें होतें.

अस्पृश्योद्धार त्याच्यापैकीं सर्वांना आवश्यच वाटत होता. परंतु ज्या गतीने कार्य सुरू होतें, ती गति—नव्हे तो मार्गही—त्याना पटत नव्हतीं. आश्रमात ह्याबद्दल पुष्कळदा चर्चा होई.

" हरिजन आश्रम उघडणं म्हणजे निवळ ढोंग आहे. हिंदुस्थानच्या आठ कोटी अस्पृश्याचा प्रश्न हे आश्रम सोडवणं शक्य नाहीं. "

" का नाहीं ? जगात निरनिराळ्या धार्मिक क्रात्या झाल्या, त्या आश्रमवासीयानींच घडवल्या होत्या. ख्रिश्चन धर्माचे मिशनरी, बुद्धाचे भिक्षू आणि प्राचीन आर्यांचे ऋषि ह्यानींच आपला मतप्रसार झपाट्यानें वैं यशस्वी रीतीने केला. ऋषिप्रथा मोडताच हिंदूधर्माचा प्रचार नी प्रसार थाबला ना ? "

" धर्माचा प्रचार आणि एका सामाजिक दुष्ट रूढीचें उच्चाटन ह्यात दोन ध्रुवाचें अंतर आहे. धर्म हा आत्मशातीसाठीं आवश्यक आहे. प्राणिमात्राला त्याची जरूर भासते. प्रचारक धर्म ही वस्तु नवी निर्माण करीत नाहीं. तर एक धर्म काढून, दुसरा तेथें स्थापन करतात. उलट अस्पृश्यता ही धार्मिक बाब नसून सामाजिक आहे. प्रत्येक सामाजिक रीतिरूढीला धर्माचा आशीर्वाद मागण्याची जी आपली रीत होती, तिच्यामुळें अस्पृश्यतेवर धर्माचा शिक्का बसला. "

" धर्म व्यक्तिनिष्ठ आहे. अस्पृश्यता समाजनिष्ठ आहे. तिचा नाश करायला समाजानें उद्युक्त झालें पाहिजे. आणि जाणत्यानीं त्याला उद्यत केलें पाहिजे. "

तुमच्या हरिजनोद्धाराचा पायाच पटत नाहीं आपल्याला. टोपली खराटे घेऊन किती शतकं आपण त्याची वसती स्वच्छ ठेवणार आहोंत ? आणि आपण किती थोडे आहोंत. खेडोंपाडीं पसरलेल्या ह्या गरीब वस्तींत कुठवर जाणार ? "

" कुठवर जाणार ? गेलं पाहिजे. तुमच्या पूर्वजानीं पापं केलीं तीं भरलीं पाहिजेत ना ? "

" मागच्या पिढ्यानीं पापं केलीं असं म्हणण्याचा हक्क पुढच्या पिढयाना कधींच पोंचत नाहीं. त्यानीं चुका केल्या असतील; पण आपण चुका करीत नाहीं का ? महात्माजीनी प्राण इरेला घालून ' जातीय निर्णय ' बदलून घेतला. बंगाल आजच त्याच्या विरुद्ध आहे. मी म्हणतों एका माणसाने आपलं वजन खर्च करून एका मानवी समाजाचं नशीब बदलून घेणं हे अनिष्ट आहे. ही लोक-सत्ता नाहीं. "

मी हें मत ऐकून चकित झालें.

" तुम्ही ह्या आश्रमात आलात कशाला ?"

" कशाला ? बाहेर सगळं काम बंद आहे. आमच्या देशाला एकच वेड लागल आहे. " अस्पृश्यताका नाश हो ! " ह्या लोंढयाला तोंड द्यायचं कसं नी कुठे ? त्याचा जोर जरा कमी होईपर्यंत डोक वर ठेवायला पाहिजे. दुसर अस्पृश्यतेवर माझी भक्ति आहे अस तर नाही ना ? "

आणि अशीं बडखोर मतं मला सहवासानंतर रोज ऐकायला येत. दादाला मात्र त्याचा वास क्वचित येई. कारण त्याचें जीवन थोडे अतिमानवीच होते. श्रद्धेच्या पायावर आतरिक संवेदनेवर विसंबून तो पुढे जात होता. त्याची कार्यशक्ति अमर्याद व अविश्रात होती.

आश्रमांत आम्ही सर्व मंडळी एकत्र जेवत असूं. आमच्या आश्रमात एकही नोकर नव्हता. स्वच्छता, व्यवस्था, सर्व कामें वांटून दिलेलीं होतीं. स्वैंपाक सर्व मंडळी पाळीपाळीनें करीत.

बाहेरचीं कामेंही प्रत्येकाचीं निश्चित झालीं होतीं. आठवड्यातून दोनदा वस्तींत जाऊन स्वच्छता करावयाची. आजारी मंडळींना भेटून कांहीं मदत—शक्य असल्यास—द्यावयाची. मुलाची शाळा आम्ही सुरू केली होती. मी आल्यावर स्त्रियांसाठीं एक वर्ग उघडून शिशुसंगोपनाबद्दल माहिती द्यायला सुरवात केली.

...मी प्रथम हरिजन वस्तींत गेलें, आणि घरोघर हिंडलें, त्या लोकाचें जीवन अगदीं जवळ जाऊन पाहिलें. माझ्या मनावर काहीं विशेष परिणाम झाल्याचें मला तरी आठवत नाहीं.

त्याचें दारिद्र्य, आळस, घाणेरडेपणा.. सगळं सगळं—निरनिराळ्या वेळेला वाचलेल्या माहितीवरून—मला माहितच होतं जणूं. त्याची वस्ती होती त्यापेक्षा, अधिक स्वच्छ सापडती, तेथें दारिद्र्य कमी प्रमाणात आढळते तरच कदाचित माझ्या मनाला आश्चर्य वाटलें असतें.

ह्या हरिजन वस्तीबद्दल दोन गोष्टी मला विशेष वाटल्या. एक तर शहराच्या एकंदर वसतीशीं तुलना करता, त्याची सख्या फार मोठी होती. पंचवीस हजाराच्या वस्तींत पधरा हजार अस्पृश्य होते.

साधारणपणे अस्पृश्य आपली उपजीविका शेतीवर मजुरी करून व स्वच्छता करून करितात. इथल्या अस्पृश्याची स्थिती पुष्कळच निराळी होती. पत्रावळी व विड्या हे दोन मोठे धंदे त्याच्या हातात होते. दोन्ही धंदे जोडधदे म्हणून करण्याजोगे होते. अनेक कुटुबे त्याचा तसा फायदा घेतही होतीं. परतु पुष्कळशा कुटुबातून, त्याचा एकमात्र धदा पत्रावळी लावणे किंवा विड्या वळणे हाच होता, त्यामुळें ही वसति दरिद्री गचाळ असली तरी त्या दारिद्र्याला घाणेरडेपणालाही मर्यादा होती. उच्च वर्गाच्या नित्य सानिध्यानें येणारी दास्यवृत्ति, शिळें सडके अन्न, जुने वापरलेले कपडे, इत्यादींचा त्याच्या जीवनात अभाव होता. शहरात सफाईला जाणारे महार व इतर मजुरी करून खाणारा वर्ग ह्याच्यात मूलतः फरक दिसून येई.

दादानें आश्रम उघडल्याला सरासरी चार महीने झाले होते. त्यानें आपला सर्व धनसचय खर्चून आश्रम तयार केला. आश्रमनिवासियानीं स्वताबरोबर आणलेले शें दोनशे रुपये एकत्र करून, सध्या आश्रमचा खर्च अतिशय काटकसरीनें चालला होता. तथापि हें साठलेले पाणी किती दिवस पुरणार? आश्रमाचा स्वतःचा खर्च अन्नखर्चापलिकडे फार थोडा होता. थोडीशी स्टेश-

नरी व सूत काढायला लागणारा कापूस. सूत नियमित कातलें जाई व आश्रमांतच त्याची खादी विणण्याची व्यवस्था होती.

इतर खर्चासाठीं पुढे मागें आवश्यक तर भिक्षा मागावी असे दादाचे म्हणणें होतें; तर समाजानें त्याना आवश्यक ती मदत करावी असें त्याचे सहकारी म्हणत होते.

" समाजाला आपलें कार्य पटलें तर समाज मदत करीलच. पण नाहींतर समाजाकडून साह्याची अपेक्षा करण्याचा आपल्याला काय हक्क ? आपण हरिजनोद्धारासाठीं झिजतों, ते समाजावर उपकार करण्यासाठीं नाहीं. "

" आमची ही प्रवृत्ति असली तरी त्यामुळे समाजाला फायदा पोचतो ना ? समाजानें आमच्या कार्यात साह्य करून आमचे कार्य सुकर करूं नये का ? "

" तो प्रश्न आपला नाहीं. दुसऱ्याच्या डोळयातले कुसळ पहाण्यापेक्षा, आपल्या डोळयातले मुसळ प्रथम काढू या. "

आई दादाला नेहमींच ' देवमाणुस ' म्हणत असे. त्याच्या सहकाऱ्यानाही त्याच्याबद्दल असीम आदर होता. कारण तत्त्वासाठीं कोणताही त्याग करताना तो मागेपुढें पहात नसे. त्याचे मन शुद्ध उदार व म्हणून विलोभनीय होतें. प्रेम हा त्याच्या जीवनाचा पाया—प्रेम हा त्याच्या जीवनाचा मूलमंत्र. आणि हें प्रेम त्याच्या अंतरंगातून उमळून येई. प्रेमविषय कसाही असो, त्याचें त्याला भान नसे.

त्याच्या वैयक्तिक जीवनांत ' मी–माझं ' ह्या भावनेचा जो अंश होता, तो ह्या आश्रमीय जीवनात लुप्त झाला होता. स्वताचें असें त्याच्याजवळ काहीं नव्हतें. स्वताच्या सुखसोयी त्याला आवश्यक वाटत नसत.

सहकाऱ्याच्या असीम आदराबरोबर अतीव स्नेहाची देण त्याला होती. परतु बाहेरच्या जगात...

बाहेरच्या जगात तो साधू म्हणूनच ओळखला जाई. साधारणपणें ' बाबा ' ह्या अभिधानानें लोक त्याला संबोधीत. तो आठ-

वड्यांतून दोनदा वस्तींत भजन करायला जाई. त्यावेळीं पुष्कळ गर्दी तिथें लोटत असे. आजारी मुलें त्याच्या पायावर घालणारे भाविक पुष्कळ असत. रामरक्षेचा आगारा कित्येक त्याच्या-जवळून मागून नेत.

तो त्याच्या घरीं गेला म्हणजे त्याना अतिशय आनंद होई व जन्म कृतार्थ झाल्याप्रमाणें वाटे. पण—

सर्व साधूंच्या नशिबीं असणारें जीवन द्वादाच्या वाट्यालाही येईल अशी भीति मला वाटूं लागली होती. जनता त्याला साधू-सज्जन समजून त्याची पायधूळ मस्तकीं धारण करायला तयार होती; पण त्याचें अस्पृश्यता-निवारणाचें वेड त्याना पटत नव्हतें. विशेषतः वृद्धमंडळी त्याबाबत उदासीन नव्हे तर थोडी साशंकही होती.

" बाबा देवमाणूस आहेत त्याना दुनिया काय समजते ? " ही त्याची विचारसरणी.

एकदा मी स्वच्छतेबद्दल त्याना समजाऊन सागत होतें; तर एक म्हातारा म्हणाला,

" बाई, आम्ही ह्याच वस्तींत वाढलों. आमचीं पोरच काय मरणार आहेत. बामण मोठे सोवळे—साफ असतात; त्याच्या घरीं पोरं मरत नसतील जणूं ! "

एकदा मी दारुबद्दल पुरुषाना सागत होतें, नेहमीचे भावनामय व्याख्यान देण्याच्या भरात मी आलें असताना एक तरुण बाई आपल्या घराच्या ओट्यावरून म्हणाली,

" तुम्हीं बामण नाहीं नाल्यानीं लोळत ! त्याचा इटाळ होते का तुम्हाला ? "

खरेंच त्याचा विटाळ का नाहीं होऊं तुम्हाला. इथल्या वस्तीचे अस्पृश्य मेलेलं मास खात नसत. त्यात पुष्कळसे पंढरीचे वारकरी होते. ते तर अनेक स्पृश्याहून स्वच्छ व शुद्ध वाटत मला.

' रूढी ' एक मन म्हणे; पण दुसरें मन विचारी " रूढी ! मग युरोपीयन, मुसलमान तेवढे स्पृश्य का ? "

" दोघेही जेते म्हणून आले. त्याना अस्पृश्यात सामील कर-ण्याची हिंमत आमच्या धर्ममार्तंडांना नव्हती."

" मग ? "

" मग अस्पृश्य हे जित–दास असले पाहिजेत. आर्यांनीं आर्यावर्त जिंकून जे शातीनें रहाणारे लोक गुलाम केले, ते तेच हे शूद्र अस्पृश्य ! "

असे कांहीं विचार मनात आले म्हणजे माझें मन पिळवटून येई. दिवसभर मरून, कष्ट करून समाजाच्या धारणेचीं साधनें पैदा करावींत. पण......

पण स्वताःच्या पोटाला गोळाभर अन्न मिळालें म्हणजे फार झालें. त्याच्या या अमाप सेवेसाठीं अर्ध पोटीं अन्न आणि समाजाकडून निर्दय अमानुष बहिष्कार येवढीच त्याची प्राप्ती !

ह्याचा उद्धार करायचा म्हणजे काय ? ह्याना आपण शिवलों, घटकाभर आपल्या घरात येऊन बसूं दिलें; देवळात येण्याचा अधिकार दिला म्हणजे सपेल का अस्पृश्यता ?

माझ्या अल्प बुद्धीला गोंधळल्यासारखे होई. त्यातच अस्पृश्याच्या शका पुढें येत.

" आम्हाला काय तुम्हाला भेटावं लागतं ? नाहीं शिवत, तर आमचं काय जातं ? "

आमच्या कार्याविषयीं त्याची उदासीनता पाहिली म्हणजे मला अधिक खिन्नता वाटे. मला खिन्न पाहिली म्हणजे दादा मला उपदेशाचे घुटके पाजूं लागे.

" उज्वल कर्तव्य करणं आपल्याकडे फलाची निष्पति होईल. फलाकडे लक्ष ठेऊन काम करणाराचें लक्ष कामापेक्षा फलात रहातें. "

" दादा, आपले मार्ग तरी बरोबर आहेत का ? का आपण मृगजळामागें जातों आहोंत ? "

" सशयात्मा विनश्यति " तो हंसून म्हणे.

"श्रद्धेचा माझ्याजवळ अभाव आहे; त्याला माझा उपाय नाहीं."

" श्रद्धा ठेवायला शीक, उज्वल श्रद्धेनें जीं कार्यें होतात तीं बुद्धीला नाहीं झेपत. "

" खरंच असेल का हें ? " मी मनाला प्रश्न करी.

## अनुभव ६

" काय रे रामा, काम होतं का काहीं ? "

' नाही बा ' म्हणत रामानें आपली घोंगडी आणि हातातली काठी खाली टाकली; आणि तो खाली बसला. त्याने ' काम नाही' म्हणून सागितलें, तरी कामासाठींच तो आला होता येवढा विश्वास मला अनुभवाने होता.

" कसं चाललय् तुझं ? तुझी कारभारीण नी पोर बरीं आहेत ?"

रामानें चंचींतून तंबाखू काढून हातावर चुरली आणि चिलमींत भरली. काडी पेटवून चिलिम पेटवीत म्हणाला,

" तुमच्या आशीर्वादानं सर्व बेश आहे. "

मीही पुढें बोललें नाहीं, कारण रामा आपले काम सागितल्या-वाचून जाणार नाहीं इतकी मला खात्री होती.

मेचा महिना सुक्या लाकडासारखा रात्रं-दिवस जळत होता. संध्याकाळीं सात वाजून गेले तरी हवा अजून 'फू फूं' करीत होती.

मी बाहेर आगणात खाट टाकून पडले होते. तलखी कमी होईल ह्या आशेने हातातल्या पख्याचा उपयोग अविरत चालला होता.

दादा सभेला गेला होता. गावात अस्पृश्यतेवर शास्त्रार्थ चालला होता; हें विद्वत्ताप्रदर्शन एकंदर तीन दिवस चालायचे होते.

मला त्यात काहीं अर्थ वाटत नव्हता. मी दादाला म्हटलेही. " मूठभर पंडितमन्याची इतकी पत्रास कशाला रे ? उद्या "शास्त्रा-धारें " अस्पृश्यता बिनतोड ठरली तर ती आपण मान्य करणार आहोंत का ? सर्वसाधारण जनतेला पटेल तेंच शास्त्र. "

" ' पुष्कळाचं पुष्कळ सुख ' ह्या तत्त्वाकडे झुकते आहेस तूं. माझं तेवढ्यानीं समाधान होत नाहीं. शक्य तर सर्वाच्या सुखाची धडपड आम्हाला केली पाहिजे. आमचं मागणं ' सर्वे सुखीनः सन्तु ' असं आहे. "

' सर्वांना सुखी करण्याची शक्यताच मला वाटत नाहीं. तूं

महाराची ताडी सोडवलीस कीं गुत्तेवाला तुझ्या नावानीं ओरडणारच. परवाच भिकूशेट म्हणत होते कीं " महारांना करा बामण. आणि आम्हाला सर्वांना बनवा महार.' हो! महाराचीं कामं करायला हवं ना कोणी ? "

" त्याना आमचं मागणंच समजत नाहीं. महार-भंगी स्पृश्य झाले म्हणजे त्याचीं कामं स्पृश्यानीं उचलावीं नी स्वतः अस्पृश्य बनावं ही कल्पना मुळात चुकीची आहे. गलिच्छ कामं करणाराचा समाजानं तिरस्कार करूं नये, तर त्याचे उपकार मानावे. हें आम्ही त्याना शिकवतों आहों. "

" हो आई मुलाचीं सर्व कामं करतेच नाहीं का ? " ठरलेला दृष्टात किंचित थट्टेने मी प्रतिपादला.

हंसू नकोस अशी. काय चूक वाटते तुला त्यात. आई मुलाचे कोणते कष्ट नाहीं उचलीत. रुग्णालयातून परिचारका कोणतीं काम बाकी ठेवते ? पण त्याच्याबद्दल समाजाला आदर वाटत नाहीं काय ? त्या अस्पृश्य ठरतात काय ? "

" तुझ म्हणणं खर असल तरी २० कोटी लोकाना तें पटवून द्यायला अनंत काल लागेल ह्याचा विचार केलास का कधीं ? "

" जनमनात क्राति एका दिवसात कशी होणार ? हजारों वर्षांचे संस्कार एका दिवसात पुसून जात नाहींत. "

" तूं हजार वर्ष खर्च करायला तयार असशील. पण बिनभितीच्या तुरुंगात शतकानुशतकं व्यतीत करून थकलेले अस्पृश्य इतके दिवस दम धरतीलसं मला नाहीं वाटत. "

" दुसरा जवळचा मार्ग दिसतो आहे का त्याना ? जुलूम जबरदस्ती करून मिळणारे हक्क टिकवणं फार कठीण जात. त्यापेक्षा प्रतिपक्ष्याला प्रेमानं जिंकणं हा सावकाशीचा पण सीधा, निश्चित मार्ग आहे. "

" दादा, प्रेमाच्या जोरावर सिंह नी बकरी एकत्रात पाणी पितील का रे ? प्रेमावर इतका तुमचा विश्वास होता, तर साधारण स्वयंसेवकांना ' क ' वर्गात अपेष्टा सोसायला सोडून तुमचे पुढारी ' ब ' मध्यें नी ' अ ' मधें कसे गेले ? "

" खरा सत्याग्रही तक्रार करीत नाहीं उज्वल, जिथें संस्कार ठेवील, तिथें तो रहातो ' अ ' आणि ' ब ' आम्हीं मागितला होता का कधीं ? "

" का नाहीं ? सरकारला वरच्या वर्गासाठीं अर्ज गेले आहेत, हें सत्य तुझ्यापासून लपलेलं खास नाहीं. वर्तमानपत्रं वेळोवेळीं टीका करीत त्या निराळ्याच. "

दादाचा चेहरा गंभीर झाला. " अशी मंडळी आमच्यामधे होती, म्हणूनच आमचा त्याग बहुताशी निष्फल झाला. पण आमच्या प्रयोगाची उज्वल बाजू आम्ही पहातों, आणि भविष्या-बद्दल आम्हाला आशा वाटूं लागते.

" मनुष्याच्या जन्मजात चांगुलपणाबद्दल तुला विश्वास नाहीं उज्वल म्हणून असं होतं. मनुष्य जन्मतः वाईट नसतो. त्याचे संस्कार त्याला सुष्ट किंवा दुष्ट बनवतात. हे संस्कार नष्ट करायला पाहिजेत; आणि ते खचित होतील. निदान मी आशावादी आहे. "

श्रद्धा ! श्रद्धा !! दादाच्या हृदयात श्रद्धेची अखंड ज्योत तेवत होती. तिचा प्रकाश चारी दिशाना फाकला होता. आणि त्या प्रकाशात येणाऱ्या वस्तुमात्रावर त्याची प्रभा फाकत होती. माझ्याही मनावर त्याचा परिणाम होईच. त्याचे शब्द अधीरपणे मी पिऊन जात होते.

" तुमच्या लक्ष्याकडे तुम्ही नीट न्यहाळून पहा. आणि जिथ पोचायचं आहे त्या ध्येयाला शोभणारे मार्ग पसंत करा. व्यक्ति-मात्रावर प्रेम करायला शिकवणारा नवा धर्म निर्माण करताना रक्ताच्या नद्या वहावून चालेल का ?

" आणि रक्ताचे पाट काढून आणलेली क्रांति तरी आपलं कार्य पूर्ण करते का ? रक्ताला लालचावलेली ही लाव आपलीच मुलं खायला लागते. उज्वल, आयर्लंड, फ्रान्स, रशिया सगळ्याचा इतिहास हेंच सागतो... "

दादाचे शब्द माझ्या हृदयात जाऊन पोंचले. बुद्ध ख्रिस्त ह्यांनी जगाला प्रेमाचे संदेश दिले. आणि त्यांनीं तात्पुरतें का

होईना, आपलें कार्य केलें. इतिहासवर दोघेही आपला छाप मारून गेले ना ? हजारों मानवी आयुष्याचे प्रवाह त्यानीं बदलून टाकले कीं नाहीं ?

मी दादाबरोबर सभेला गेले. आणि पांच-सहा तास तिथें घालवलेही. पण एकतर मला स्वताला संस्कृत फारसें गम्य नव्हतें, शिवाय जिथें प्रत्यक्ष कार्याची आवश्यकता, जिथें हजारों लोक अमानुषपणे सडवले जात होते; तिथें " रोग्याला औषध द्यावें का नाहीं " हा प्रश्नच मला पाशवी वाटत होता.

मला दादाचे म्हणणें कळत होतें, पण वळत नव्हते. " हे पाचपंचवीस पंडित ह्या चर्चेनतर आपलीं मनं बदलतील असं मला नाहीं वाटत उज्वल. पण सर्वसाधारण लोकांच्या मनावर एक सत्य बिंबलं कीं, धर्म दिसतो तसा नाहीं. तेथेही रूढीचें प्राबल्य आहे. अस्पृश्यता कितीही धार्मिक भासली तरी तेथेंही संशयाला जागा आहे. "

आज त्या सभेला जायचा मी आळस केला. दादा आपल्या सहकाऱ्याना घेऊन सभेला गेला होता. आश्रमात रहाणारे हरिजन विद्यार्थी बहुतेक बाहेर गेले होते.

मोहन दादाच्या सासुरवाडची मंडळी काशीला जातांना आमच्या घरीं एक दिवस रहायची होती म्हणून आईही गावात २-३ दिवस गेली होती. आणि मी आश्रमात एकटी होतें.

मी आपल्याच तंद्रींत होते. रामाचे अस्तित्व मी जवळ जवळ विसरलेंच होते त्यामुळे त्याचा आवाज पुनश्च ऐकून मी दचकलें.

" आज मोठा पोरगा तापानीं फणफणला आहे. "

" उन्ह तर नाहीं लागलं. "

" लागलं असल. उन्हातान्हानं काम करीत हिंडावं लागतं. सार आग बी दुखा लागलय्. "

" म्हणजे ? "

" मारोत्याच्या पोरानं मारलय् त्याला खूप. "

" मारलं का म्हणून ? मी आश्चर्यानें म्हणालें.

" शेताचा कबजा करायला आले होते."

' मग '

" त्यांनीं वखर घातला आम्हीं काढून फेंकून दिला."

ह्या पद्धतीनें मला जास्त कळण्याची आशा वाटली नाहीं म्हणून मी त्याला थांबवून म्हटलं,

" सगळं नीट साग रामा. तुझ्या शेतात तो वखर घालायला कशाला आला ? तुम्ही उगाच मारामाऱ्या का केल्यात ? असा काय अंधेर झालाय जगात ? "

रामा जरा खाकरला नी म्हणाला, " बाई जगात गरिबाचं कोणी नाहीं. देवसुद्धा त्याना नाहीं पहात. मी शेत घेतलं वहायला तेव्हा नुसता मोथा नि हरळी होती. आज दहा वर्षे वाहून वाहून काळं केलं. त्याचा सारा वाढला, उत्पन्न वाढलं. आता आला मारोत्या आयत्या बिळावर नागोबा. "

' पण मारोत्याचा काय संबंध रे त्यात. '

" त्याचं असं बाई. शेत आहे नथूमल शेटचं माझ्याकडे दहा वर्षे राहिलं बघा. आता वावर काळीला आल. तो मागत होता शंभर रुपये. ह्या दिवसात शंभर रुपये कुठून देऊं आणि बायका-पोराना काय घालूं ? मी त्याला सत्तर रुपये द्यायला तयार होतों. "

माझ्या डोक्यात उजेडाची तिरीप पडूं लागली होती. " म्हणून नथुमलजीनीं वावर मारुतीला वहायला दिलं होय ? "

माझ्या ह्या साध्या शब्दांनीं रामा एकदम संतापला.

" येऊं द्या त्याला पाहीन कसा येतो तो ? हड्डी नरम करतों. वावरांत वखर तर घाल म्हणावं. लंबे करतों त्याला. "

मी मोठ्या मुष्किलीनीं त्याला आवरला. " रामा, शेत नथु-मलजीचं. तूं त्याची योग्य मागणी नाकारलीस. नथुमलनीं तें मारोतीला दिलं. आता ह्या मारामाऱ्या कशासाठीं बरं ? "

रामा पुन्हा एकदां चिडला " शेत काळं कुणी केलं ? नथु-मलच्या बापानं ? रात्रंदिवस आम्ही खपतों. आमच्या निढळाचा घाम गाळला आहे आम्ही. आतां शेत नथुमलचं. आमचा हक्क नाहीं त्याच्यावर. "

रामाचं तत्त्वज्ञान माझ्या ध्यानात यायला न जाणे किती वेळ लागला असता ! पण इतक्यात आश्रमचीं हरिजन मुलें परत आलीं.

" बाई, मी सागतों तुम्हाला सर्व " त्यांतला एक म्हणाला "हा रामा त्या नथुमलचं शेत दहा वर्षांपासून वहातो आहे. शेत अगदीं वाईट होतें. जनावरासाठीं गवतच काढीत होते त्यात. रामाला सर्वांनीं सागितलं माणूस नतद्दष्ट आहे; तूं त्याच्या फंदांत सापडूं नकोस. त्यांनीं ऐकलं नाहीं.

" शेत आता चागलं काळीला आलंयू. आता त्यानं तें मारोतीला शंभरांवर लावून काढलं. रामानीं सागितलं कीं आपण शेताचा कबजा देणार नाहीं. आता नथुमलला कोर्टात केस करायला पाहिजे. पण हे मारवाडी आपसात भाडण लावणारे पक्के. कोर्टात गेलं कीं सतरा भानगडी निघतील. सतरा उचापती कराव्या लागतील. म्हणून त्यानीं मारोतीला चिथावलं. मारोत्या दहा माणसं घेऊन आज वावरात वखर धरायला आला. अन् मग झाली मारामारी. "

मी अधिरतेने विचारलें " मारोत्या कोण आहे ? "

" बाई माळी आहे."

मी एकदम चरकलें. अंतर्ज्ञातीय झगडे ह्या भाडणांतून पैदा होणार का ?

" रामा, तुझ्या पोराला मी बघायला येतें चल. फार लागलं असेल तर इस्पितळात न्यावं लागेल."

पुन्हा एक विद्यार्थी हंसून म्हणाला, " बाई रामाच्या पोराला पुष्कळ लागलंयू. त्याच्या पाठीवर लाठीचे वळ उठलेत. कपाळावरही घाव झाला आहे. पण दवाखान्यात त्याला कोणी घेणार नाहीं. फौजदारी झाली तर हें सर्टिफिकेट उलटेल ना नथुमल अन् मारोतीवर.

त्यानीं मारोतीचा साक्षू तिथें दाखल करून घेतला आहे. त्याला तशी जखम फार नाहीं. पण मूठ भरली असेल नथूमलनं.

मी व्यग्रतेनें उठून रामाबरोबर निघालें. " आपण तुझ्या

पोराला 'ओवापाणी' तर देऊं या. बाबाची प्रार्थनेची वेळ झालीच आहे. ते आतां येतील परत. ते काय करायचं तें पहातील.

मी हरिजन वस्तीकडे जाताना दादाचे शब्द माझ्या मनावर आदळत होते. "मनुष्य निसर्गतः चागला असतो—त्याचे संस्कार त्याला सुष्ट किंवा दुष्ट बनवितात......प्रेमानेच व्यक्तिमात्राला जिंकलें पाहिजे."

माझें मन संशयानें विचारीत होते, "आता कोणाला जिकायचें? नथुमलला? मारोतीला? का दोघानाही?"

---

## विकास ७

मी गोविंदाला पाहून परतले, तों दादा मला वाटेंतच भेटला. आश्रमात परतून येताच त्याला मारामारीची वार्ता समजल्याने तो रामाच्या झोपडीकडे निघाला होता.

"मुका मार बसला आहे. भुवईवर तेवढी जखम झाली आहे. भुईलोण नी चुना लावला आहे. ताप भरला आहे. आग पण ठणकतं आहे. दवाखान्यात नेला तर बरं"

दादा अक्षरही न बोलता पुढें चालत होता. त्याच्या संवयीप्रमाणें तो विचारात गुंतला असावा, असा माझा सहजच अंदाज होता.

बऱ्याच वेळानें तो म्हणाला, "दवाखान्यात नेऊन टाकण्यात मला अर्थ दिसत नाहीं. आपला डॉक्टर पुरेशी मदत देऊं शकेल; त्यानीं मेडिकल स्कूलमधें ३–३॥ वर्षे घातली आहेत ना?"

"केस कोर्टात गेली तर डॉक्टरचें सर्टिफिकेट लागेल म्हणतात." किंचित विषादानें तो म्हणाला "कोर्टात केस? कशाला नि? ब्रिटिश कोर्टात न्याय मिळत नाहीं. आणि मिळालाच तर तो किती महाग? गरीबानीं त्या भानगडींत कधीं पडूं नये."

मला त्याच्या म्हणण्यात तथ्य वाटलें......दादाचें मन बरेंच

त्रस्त व चिंताग्रस्त होतें. त्याचा सुकुमार चेहरा उतरून गेला होता. सकाळचीं आह्निके आटोपल्यावर तो बाहेर निघाला.

" उज्वल, मी मारुतीकडे आणि नथुमलकडे जातों आहे. "

" एकटाच ? "

" हरकत नाहीं ना काहीं ? " तो हंसून म्हणाला.

" मी येऊं का ? "

" चल, पण उन्ह फार होईल परत यायला, त्याचा विचार कर. "

न बोलता मी पायात वहाणा अडकवल्या आणि छत्री उचलली.

हरिजन वस्तींत अवश्य ती माहिती मिळवण्याचा आम्ही प्रयत्न केला. रामाने सागितलेल्या माहितीपेक्षा फारसें काहीं त्या प्रयत्नात निष्पन्न झाले नाहीं.

" नथुमल लोभी मनुष्य आहे. मारुति गुन्हेगार आहे. जेलात जाऊन आला आहे. येवढेंच आम्हाला समजलें.

नथुमल मोठा गोडबोल्या मनुष्य दिसला. त्यानें चार पावलें पुढे येऊन आमचे स्वागत केलें, लोडाशीं बसायला जागा दिली; आणि ' पान ' आणण्याचा नोकराला हुकूम दिला.

दादाने आपलें काम थोडक्यात समजाऊन सागितलें.

" अच्छा ? मारामारी झाली म्हणता ? " त्याने आश्चर्यानें विचारले. " मला माहीतच नाहीं. फार लागलं काय कोणाला ? "

..." आपसांत मिटवून टाकूं या. "

" हा हा आमची काय हरकत आहे. सरकारदरबार आम्हाला काय गोड वाटतें ? "

दादाने त्याला सुचवले कीं त्यानें तें शेत रामाला पुनश्च द्यावे. त्यावर तो अजीजीने म्हणाला, " बाबाजी तुमच्यासारख्याचे पाय आमच्या घराला लागावे आणि इतकी लहान गोष्ट आम्हाला करता येऊं नये; ही मोठी दुःखाची गोष्ट आहे. पण मी तरी काय करूं ? मी मारुतिकडून कबलायत करून घेऊन रजिस्टर सुद्धा केली. आता माझ्या हातात काहींसुद्धा उरलं नाहीं. रामाला मी आधींच सागत होतों. "

" पण शंभर रुपये भरण्याची त्याची अवकत कुठें आहे ? " मी मधेंच म्हणालें.

" बाई, तुम्हाला ह्या लोकाचा अनुभव नाहीं. हे महाधूर्त असतात. आपण त्याच्या गरिबीवर जातों; त्याचा ते फायदा घेतात. रामानीं गोंद्याच्या मोहतिरात पाचशे रुपये खरचले कीं नाहीं विचारा बरं त्याला ? "

" दादा किंचित् थाबून म्हणाला " तुमचं म्हणणं खरं आहे शेटजी. पण ते पाचशें रुपये त्यानं शेताच्या जिवावर कर्ज काढले असतील. आता शेत गेलं, म्हणजे आधारच गेला सारा त्याचा. "

" शेटजी मोहतिर एकदा होतं. खंड दरसाल द्यावा लागतो."

" म्हातारी मेली तर हरकत नाहीं. काळ सोकावण्याचं भय. होय ना ? " शेटजी हंसत म्हणाले.

सगळी मंडळी चुप बसली होती. पुढें काय करावें ह्याचा विचार आपापल्यापरी प्रत्येक करीत होता. अखेर शेटजी म्हणाले,

" बाबाजी, तुम्हाला विन्मुख पाठवण माझ्या जिवावर आलं आहे. रामाला दुसरं काम मिळेपर्यंत मी नोकरी लावून देतों— बिडीच्या कारखान्यात. "

दादाने नकारात्मक मान हलवीत म्हटले, " एका शेतकऱ्याचा मजूर बनवणं मला कधींच मंजूर होणार नाहीं. "

" पहा बुवा, मला सुचलं तें सागितलं. "

" मारुतीने आपली कबलायत परत घेतली तर ? " मी म्हणालें

" मला फार आनद होईल. रामा माझ्या जुन्या कुळापैकीं . आहे. मी मोठ्या नाखुषीनें जमीन मारुतीला दिली. रामाला मी पुष्कळ समजाऊन सागितलं पण त्यानं तें मानलं नाहीं. आता फुकट्या सर्वांच्या गळ्याला फास आणलान. "

...आम्ही शेटजींचे आभार मानून निघालों तोंपर्यंत दहा वाजून गेले होते. सूर्यनारायण पूर्ण तेजाने आपल्या सिंहासनावर आरूढ झाल्यानें पृथ्वीचें रूपातर रसरशीत भट्टींत झालें होतें.

पायात वहाणा असूनसुद्धा पृथ्वीच्या गरम झळांनीं पायाचा वरचा हिस्सा पोळत होता. ह्या किरणशरापासून माझे संरक्षण करायला छत्री असमर्थ होती. तोंडावरून व मानेवरून घामाच्या धारा वहात होत्या. उन्हाने डोळे दिपून जाऊन, डोळे बंद करून चालायची तीव्र इच्छा होत होती.

ह्या उन्हातून आम्ही माळीपुऱ्यात आलों. घर विचारता विचारता एका मोडक्या कौलारापाशीं येऊन पोचलों.

मारुती व त्याची बायको दोघेही बाहेर गेली होतीं. त्याचीं तीन उघडीं-नागडीं मुलं रस्त्यावर खेळताना सापडलीं. त्याना मारुतीला आश्रमात पाठवण्याबद्दल निरोप सागून आम्ही आश्रमात परतलों.

...दादाने मौनव्रत घेतले ह्यात मला काहीं आश्चर्य वाटलें नाहीं; नव्हे माझी तीच अपेक्षा होती. कोणताही महत्त्वाचा प्रश्न त्याच्यापुढें आला, म्हणजे निर्वेध शातता लाभावी म्हणून तो मौन धरी.

त्याचे मौन प्रार्थनेच्या वेळीं सुटले. दिवसभर केवळ पाणी व थोडें मीठ ह्याच्यावर राहिल्याने त्याचा आवाज किंचित् थकला असला तरी त्याला एक तीक्ष्णता प्राप्त झाली होती. त्याच्या आवाजाला निनाद आला होता.

भक्तिरसावर श्रद्धेने त्याने सागितलेले चार शब्द आमच्या अंतःकरणाला विधून गेले.

"परित्राणाय साधूना सभवामि युगेयुगे" ह्या शब्दावर आमच्या हृदयात अभावित श्रद्धा निर्माण झाली.

मारुति सध्याकाळीं आला नाहीं—दुसरे दिवशीं सकाळींसुद्धा! अखेर संध्याकाळीं आम्ही पुनश्च माळीपुऱ्यात आलों.

बाहेरच कळलें कीं मारुति घरीं नव्हता. बहुधा नित्य नियमाप्रमाणें ताडीच्या दुकानावर स्वारी बसली होती.

"तुमच्या भेटीचें कारण त्याला नथुमल शेठकडून समजलं आहे. दोघं नवरा बायको तुमचा जीव घ्यायला तयार आहेत.

तुम्हीं उगीच प्राण धोक्यांत घालूं नका." सायंकाळच्या गप्पा-साठीं एकत्र झालेल्या मंडळीनीं सांगितलें.

"मरायचं एकदाच असतं." दादा म्हणाला, "दादा मी जातें. तूं थाब. मरायचाच प्रश्न असेल तर जायला काहीं हरकत नाहीं. पण मारुति घरीं नाहीं त्याची बायको तेवढी आहे. मला वाटतं मी तिच्याशीं जाऊन मनमोकळं बोलू शकेन."

माझं म्हणणं सर्वांना पटल्यानं दादा तिथे थाबला. मी पुढें गेलें.

मारुतीच्या घरात अक्काबाईची नित्य वसति असल्याचा अनु-भव मला आला. दिवे लावणी झाली तरी घरात दिवा नव्हता. पोरं रडत होतीं, सारजा त्याना धपाटे घालीत होती.

मी तिला हाक मारलेली ऐकून ती बाहेर आली.

तिनें मला किती-किती शिव्या घातल्या. तिची ती संस्कार-रहित शुद्ध गावठी भाषा ! त्या शिव्यासुद्धा कशा वेचक होत्या. त्या सत्या भाष्याचें सार मात्र लहानच होते.

मी त्या 'जोगड्याची' बहीण, तिच्या पोराबाळाच्या तोंडचा' घांस काढून ह्या रड्याना देणार होते.

तिचा रागाचा पारा किंचित् कमी झाल्यावर मी तिच्याशीं सहानुभूतीने बोलूं लागले.

तिची, तिच्या मुलाची, मारुतीची, त्याच्या दुर्दैवाची, सगळी माहिती मी प्रथम प्रश्नोत्तरानें काढलीं; आणि मागून तिचं मन शात झाल्यावर तिनें आपण होऊन सागितली.

पाच वर्षांपूर्वी मारुति एका खोट्या आरोपावरून जेलमध्यें गेला. पाटलाच्या घरीं लग्न झालं, त्याला हवी होतीं फूलं नी भाजी. त्याचे योग्य पैसे द्यायला पाटील तयार नव्हता. त्यावरून दोघाची बोलीचाली झाली. नी दोनच महिन्यात पोलिसनीं मारुतीला एका दरवड्यात पकडलें. मारुति तेव्हा गावाबाहेर आपल्या छोट्याशा तुकड्यात बागाइत करून पोट भरीत असे.

ह्या खटल्यात भांडण्यासाठीं घरदार सारं सावकाराकडे गहाण

पडलं. आणि वकीलाचं नी सरकारचं घर भरलं. इतकंही करून मारुतिला दोन वर्षांची शिक्षा झालीच.

त्याचीं पोरं उघडीं पडली. सारजाने मोलमजुरी करून त्याचें पोषण केले.

मारुति सुटून आला. पण जेलातून सुटून येणाऱ्या कैद्याला काम कोण देणार? नाइलाज झाला तरच त्याची आठवण लोकाना येणार? त्यामुळ आज तीन वर्षे हंगामी कामावर त्याचं जीवन होतं. काम मिळाल तर भाकरी नाहींतर उपास. सारजाला जी मजुरी मिळे, त्याच्यावर अवलंबून होतीं सारीं.

एकदा जेलची हवा खाऊन आल्यावर मारुतीवर पोलिसचा सर्वकालीन संशयाचा हक्क प्रस्थापित झाला. कुठेही तालुक्यात चोरी-दरवडा असे काहीं प्रकार झाले कीं पुन्हा मारुतिला पोलिस चौकींत आठ पंधरा दिवस पाहुणचार घ्यावा लागे. कबुलीजबाब काढण्यासाठीं पोलिस अत्याचार सोसावे लागत...

ह्या सर्व जंजाळातून सुटायचा एकच-एक मार्ग—दारू. तो त्यानें अवलबिला होता."

"ऐकता ऐकता माझे डोळे भरून वाहू लागले. केवढा प्रचड अन्याय! एका फाटक्या पाटलाशीं भाडण होऊन, मारुतीच्या साऱ्या आयुष्याची नव्हे कुटुंबाची वाताहात व्हावी. येवढेंच नव्हे तर ह्या अन्यायाचें शोधन करण्याचा मार्गही समाजाजवळ असू नये!

सुदैवाने बाहेरच्या अंधेरात माझे अश्रू सारजेला दिसत नव्हते. ती मला पुढें सागतच होती.

नथुमलशेठांनीं मारुतीला शेत देण्यात त्यांचा स्वार्थच होता. रामाने ते शेत आज दहा वर्षे वाहून काळं केलं होतं. त्याचं पीक वाढलं होतं. खडही वाढला असला तरी शभर रुपये थोडे जास्तच होते. रामापासून शेत हिसकावून घेण्याची हिंमत गावात फार थोड्याची होती. दिवाणींत दावा दाखल करून पैसा आणि वेळ नष्ट करायची इच्छा नथुमलशेठला नव्हती.

त्याने मारुतीला त्या शेताचें आमिष दाखवले. दुसरा तरणोपाय

नसल्यानें मारुतीनें कबलायत लिहून शंभर रुपये खंड कबूल केला. जगाला आपला प्रामाणिकपणा दाखवण्याची ती एकच-एक संधि त्याना होती.

" मी तुम्हाला दुसरं शेत देववतें. आमच्या आश्रमात माळी हवाच आहे. मारुतीला तिथें येऊन राहूं दे. "

माझे शब्द दारू पिऊन परत आलेल्या मारुतीच्या कानावर पडले. तो संतापाने ओरडत होता,

" मी का म्हणून वावर सोडूं ? रक्त साडलंय काल तिथे आम्ही. मरूं पण वावर नाहीं सोडणार. फौजदारी करू रामावर. नथूमलनीं कबूलच केलंय पैसे द्यायचं. "

त्याच्या शिव्या, त्याचे हातवारे पाहून मी इतकी स्तिमित झालें कीं मारुतीच्या पाठोपाठ दादा व आळींतली मंडळी एक मिणमिणती चिमणी घेऊन आली तें मला समजलेही नाहीं.

---

## विजय ८

" मंजू, विजू आला आहे. " आईनें गाढ झोंपेंतून उठवून मला सागितलें. माझ्या डोक्यात नीटसा प्रकाशही झोंपेमुळें पडला नाहीं.

" कुठं आहे ? " दादाचे मित्र नारायणसिंह कुटीच्या दाराशीं उभे होते; ते कांहींसें बोलले तेंही मला नीट ऐकूं आले नाहीं.

" आत घेऊन या ना ? " असें पेंगत म्हणून मी परत अंथरुणावर अंग टाकलें. तथापि विचारकेंद्रांना धक्का मिळायचा तो मिळून चुकला होता. त्यामुळें निद्रेचें पटल क्रमशः दूर झालें; आणि मी भानावर आलें तों—माझ्या मनाला हुरहूर वाटत होती. " विजय कशाला आला इथें—आज ? हाच विचार त्याचा मुळाशीं !

विजयच्या जीवनाचा ज्यांना पूर्ण परिचय होता त्यांना माझ्या ' आज ? ' चें येवढें आश्चर्य वाटायचें नाहीं.

...दादा धाकट्या आत्याचा तर विजू मोठ्या रंगू आत्याचा. आत्याचें लग्न झालें तेव्हां आजोबा मामलेदार होते. पैशाला आणि सत्तेला वाण नव्हती. त्यानीं आत्याला मोठें स्थळ पाहून दिली. पैसा पाण्यासारखा वाहवला. श्रीमंत घरीं पडलेल्या आत्याचा दर्शनयोग क्वचित्च येई आम्हाला.

आत्याला पुष्कळ मुले झाली; पण तिचीं मुलें वाचत नसत. दादा लहान असताना ती दोन दिवसासाठीं आमच्याकडे आली होती. आमच्या घराचें गोकुळ पाहून ती आईला म्हणाली.

" वहिनी तुम्ही मोठ्या भाग्याच्या आहा. माझं फळ घ्याल का ओटींत ? "

त्या वेळीं तिला दिवस होते. आई थट्टेनें हंसून म्हणाली " मी पुष्कळ घेईन. पण माझ्या गरीबाच्या ओटींत तुम्ही आपलं फळ घालाल कशाला ? "

तुमच्या नशिबानं माझ्या घराचं वृंदावन उजळलं तर उजळेल. "

आणि ' फळ ' आईच्या पदरातच रहावें, ह्या अटीवर आईने आत्याचें म्हणणें मान्य केले. त्यानंतर ५ महिन्यानीं विजू जगात आला. मोठ्या समारंभाने आत्याबाईनीं मूल नाळवारासह आईच्या पदरात घातलें.

विजू माझ्यापेक्षा दीड वर्षानें वडील.

दादा मी विजू एकत्र वाढलों आम्ही. पण त्याचें रक्त काहीं वेगळेंच होतें. त्याचा सारा जन्म दादाचें प्रत्येक कृत्य खोडून काढण्यात गेला. माझ्यावर दादाचे केवढें वजन पण...

जरा मोठा झाल्यावर तो घरीं गेला; नंतरहि उन्हाळ्याची सुटी आमच्या बरोबर घालवी तो. श्रीमंताच्या विक्षिप्त संवयी त्यानें लवकरच आत्मसात केल्या. बाहेरच्या जगात हिंडून म्हणा किंवा दादाच्या प्रत्येक कृतीला प्रत्युतर देण्याच्या प्रवृत्तीमुळें म्हणा, तो अनेकदा विचित्रमतें प्रतिपादन करी.

" वेश्यावर्ग समाजनीति टिकवण्याच्या दृष्टीनें आवश्यक आहे" हें त्याचें विधान मला तीन तासानंतरही खोडतां आलें नव्हतें.

" शासनसंस्था समाजाला आवश्यक नव्हत." ह्या विषयावर दादाशींसुद्धा त्यानें अडीच-तीन तास झुंज घेतली होती.

" कॉंग्रेस काय करणार ? इंग्रजाचं सरकार उडवून स्वतःचं निर्माण करणार ? जनतेचा त्यात काहीं विशेष फायदा होईलसं मला तरी वाटत नाहीं. लोकाना जर खरं ज्ञान असतं तर त्यानीं एक जुलूम नष्ट करण्यासाठीं दुसरा जुलूम आणला नसता."

" स्वकीय सरकार इतकं वाईट असणारच नाहीं आणि लोकसत्तेत तर नाहींच नाहीं—"

" कोण म्हणतं ? इंग्लंडवर आज निदान चारशे वर्षे लोकसत्ता आहे. सामान्य जनाचा तिनं काय फायदा केला. इंग्लंडमध्ये गरिबी नाहीं, का बेकारी नाहीं, का उपासमार नाहीं, का गुन्हेगार नाहींत ? लोकसत्तेनं काय चागलं आणल आणि वाईट काढलं ? "

दादा इतिहासातून उदाहरणे देत होता, पण शातपणे कुणाचें ऐकणे हा विजूचा स्वभाव का होता ? " माहित आहे, माहित आहे. मीही वाचलाय कीं इंग्लंडचा इतिहास. प्रथम लोकाना गाजणारे कायदे करायचे, आणि अंगावर आले म्हणजे थोरपणाचा आव आणून रद्द करायचे. Corn laws नी Free Trade हीं मोठीं उदाहरणे विसरूं नकोस त्याचीं. "

विजय जसा तापत जाई तसा दादा अधिक थंडावे. " विजू अगदीं तुझ्या म्हणण्याप्रमाणे घटकाभर मानलं कीं सरकार ही सस्था जनतेचें अहित करते तरी बाबा ते एक necessary evil ( आवश्यक पाप ) आहे. समाजाच्या धारणेसाठीं कायदे आवश्यक आहेत. शातता सुव्यवस्था राखणे भाग आहे. शिक्षण, वैद्यकी, व्यापार, रेल्वे, तारायंत्रें हीं सर्व सरकारसंस्था उपयुक्त करणारीं खातीं आहेत.

" ह्यापैकीं एकही खातं सरकार सरकारसालीं करीत नाहीं. वेडेवाकडे कायदे पास करून ते प्रजेच्या गळीं उतरविण्यासाठीं पोलीस, सैन्य, जेल, कोर्टें निर्माण करणं आणि त्याच्या द्वारा

आपली सत्ता अबाधित राखणं हेंच सरकारचं खरं कार्य ( Function ). त्याच्या ह्या हक्कांना कुठे अडथळा झाला कीं सगळीं राष्ट्रवर्धनाचीं खातीं मातीला मिळतातच कीं नाहीं.

“ सरकारे ह्या जगातून नष्ट केलीं म्हणजे मानवजात ह्या सडक्या दुर्गंधींतून बाहेर पडेल. पंचायती पोलिस किंवा सैन्यावाचून निष्क्रिय होत्या का ? काय माणसाचा स्वभाव जात्या दुष्ट विनाशक आहे. ”

“ असं अनुभवातीं वाटतं खरं ? ”

अधिकच भडकून विजय म्हणाला “ अनुभव ! जी समाजरचना मोडकळीला आली आहे तिचे अनुभव—स्थायी समाजाचे अनुभव म्हणे ! ”

दादाच्या साधुवृत्तीची तर तो उघड टवाळी करी. “ कसला आला मामी देव ग हा ? आचरटपणा किंवा भोंदूपणा दोनच दिसतात मला यात. रस्त्यात उभे राहून अंगातला एक शर्ट काढून देऊन हा काय महात्मा दिसतो होय ? चारी बाजूचे लोक गालात हंसतात ते कसे मग ? नी एका शर्टानी का सारे भिकारी झाकले जातात ? ”

...आणि जन्मभर दादाच्या कार्याची टवाळी करण्यात आणि प्रसंगीं कार्यनाश करण्यात त्याचें कर्तृत्व गेले होतें.

तो विजय आज—आज अगदीं विजयाचा पेला दादाच्या—आमच्या तोंडाशीं आला असताना यावा ! माझ्या मनाला हुरहूर वाटणं सहज नव्हत का ?

...किती कालावधि गेल्याप्रमाणे भासला मला. विजय आत शिरला तो नित्याप्रमाणें—हत्ती कर्दळीवनात असाच शिरत असेल का ? माझ्या मनात विचार आला. त्याचा तो अद्यावत पोषाख, उलटवून पोमेडनें बसवलेले केस, रेशमी कपडे, पायांतला उंची पंपशू...सारें, सारें कसें काळवेळाला सोडून वाटलें मनाला. मोठाल्या अक्षरात साऱ्या वातावरणात तोच शब्द लिहिल्याचा भास मला झाला—

" आज ? आजच ?"..." काय मंजे, नथुमल शेठावर सत्याचे प्रयोग करतां आहात म्हणे तूं नी दादा ?" पहिली धडक बसली.

" का बरं; काहीं पाप तर नाहीं त्यात ? " मी किंचित् रोषाने म्हणालें.

" दगडावर डोकं हापटण पाप म्हणतो कोण ? " तो थोडं हंसून म्हणाला. " मग कुठवर आले प्रयोग तुमचे ? "

त्याच्या स्वभावाला परिचय नसलेले नारायणसिंह उत्साहाने म्हणाले " विजयबाबू काळ्या पाषाणालाही सतत धारेने भोंक पडतें ना ? मग नथुमल तर माणूसच आहे. सत्याचे प्रयोग त्याच्यावर यशस्वी होणारच. "

विजयच्या आवाजातला उपरोध अजिबात गळला. तो तितक्याच आपुलकीने नारायणसिंहाना विचारीत होता, " ही यक्षिणीची काडी कशी फिरवलीत बुवा ? "

झाला त्रासच हो. त्या मारुतीला आमचा काहीं केल्या विश्वास वाटेना. त्याला समजवण्याचे किती किती प्रयत्न करावे लागले. त्याला मदत देण्याचा प्रयत्न आमच्याच गळ्यात यायला लागला. तो म्हणे ' तुमचा खास डाव आहे ह्यात काहीं.

" बाबा डाव कसचा. तुझ्यावर जे जुलूम झाले त्याची फेड करतोय आम्ही. "

" माझ्यासारखे हजारों लोक सडताहेत; त्याना करा कीं मदत. मी माझ्या अन्नाला लागतोंय. माझ्या डोक्यावर कशाला उपकाराचे डोंगर. "

त्याला वरच्यावर जाऊन भेटून आम्ही शेत सोडण्याचे फायदे सांगितले. त्या शेतात फायदा शंभर उरणं शक्यच नाहीं. तेव्हा वर्षाअखेर खंड भरला नाहीं कीं शेत जायचंच. त्यापेक्षां आमचे आठ दहा रुपयांची नोकरी जास्त पक्की.

त्याच्या आत्ममित्राकडून हेंच सांगवलं. शेवटीं नोकरींत गेल्यास त्याला जातींत घ्यायचं पंचानीं कबूल केलं. तेव्हा कुठें वळली स्वारी !

पंचानीं पुष्कळ त्रास दिला. प्रत्येकाचे धागेदोरे शोधावे लागले. विनयभाईना असत्याची, ढोंगीपणाची मोठी चीड. पुष्कळसं काम त्यामुळं त्याच्या चोरून करावं लागलं.

" म्हणजे सत्याच्या प्रयोगापेक्षा इतरच खटपटी सफळ झाल्या म्हणा ना ? "

" असें मात्र नाहीं. विनयभाईचं मोठ वजन आहे गोरगरीबावर. त्याना साधूपुरुष समजतात सारे. त्याच्या शब्दामुळेंच अखेर पंचानी मारुतीला जातींत घ्यायचा ठराव केला. भाईजी सतत हप्ताभर अन्नापाण्याची परवा न करिता त्या लोकाना क्षमेचे महत्त्व पटवून देत होते. "

नारायणसिंहाना कसे थांबवावें हे मला समजेना—आणि विशेषत: विजय इतक्या उत्सुकतेने आपुलकीने ऐकून घेत असताना ! निष्क्रिय बसून माझ्या मनाची हुरहूर वाढली. अखेर मी उठून आईला म्हटले.

" विजूला काही खायला बियला देत नाहींस का ग ? "

मी झोपडीच्या मागच्या बाजूला जातें तो आमच्या स्वतंत्र स्वैपाकघरातून स्टोव्हचा आवज येत होता. आणि विजूला फार आवडणाऱ्या कडबोळ्याचा सुरेख वास सुटला होता. मी आत गेलें—पण आतही माझें मन रमेना. माझी अस्वस्थता कमी होईना. कडबोळीं ताटलींत घालून मी आईबरोबर परत आलें. नारायणसिंह अजूनही सांगत होता.

हें मात्र कबूल नाहीं तुमचं म्हणणं मला. नथुमलला मनापासून भाईजींच्याबद्दल आदर आहे. मारुतीने त्याना इतके झटके द्यावे ह्याची त्याला मनापासून चीड आली होती. म्हणूनच ' ही कबलायत फाडूं नये. मी रामाला दुसरं शेत देतों ' असं तों म्हणत होता. रामाचं मागणंही गैर नव्हतं. रामाच्या घरात दहा माणसं आहेत. धावून–धूपून मेहनत करतील तर शंभर रुपये भरूनही भाकरी खातील. मारुती स्वता दारुडा. एकटी बायको काय काय करणार ? तो खचित बुडाला असता—आणि योग्यच झालं असतं तें."

" सिंगजी सत्य अहिंसा–शास्त्रात सूडाला जागा आहे का हो ? सहजतेनें विजय म्हणाला.

" कसलं सत्य नी कसली अहिंसा. महात्माजींसारख्या साधु-पुरुषांना तीं साधने नी शोभनेंही. विनयभाईसारखा एकादाच विरक्त मनुष्य त्या मार्गाला जाऊं शकतो…"

इतक्यात आई आत आली.

" पुरे रे वादावादी आता. स्वस्थपणें खा जरा. "

" मामी अगदीं थोडं राहिलंय बघ. मग सिगजी शेवट काय साऱ्या गोष्टीचा ? "

शेवट काय ? रामा ' तीन शेंड्या ' ला शिव्या देऊं लागला. मारुती आमच्या सद्धेतूबद्दल पुनश्च साशंक झाला. आम्ही शेटजींना समजावीतच होतों. अखेर काल सारा निर्णय झाला. शेठजीकडे रामा नी मारुती दोघानाही नेल होतं आम्ही. शेठ म्हणाले " माझं काय. मारुतीनी त्रास तुम्हाला दिला. तुम्ही माफ करता मग मी रागावून काय उपयोग ? मला खर म्हणाल तर दोघेही सारखेच. रामा काय मारुति काय—कोणी शंभर रुपये दिले कीं झालं. उद्या पहिली कबलायत फाडून दुसरी लिहायची आहे कोर्टात. "

आम्ही पुढच खात असलों तरी विजय विचारमग्न होता—आणि मी विमनस्क होते—त्याच्याकडे पाहून पुनश्च माझा प्रश्न जोरानें उसळी घेई.

" आज ! आजच ? "

---

## सत्य आणि असत्य ९

आज २–३ केंद्रात जायचे असल्यानें घरीं यायला बराच उशीर झाला. आश्रमाच्या फाटकातच डॉक्टरबाबू भेटले त्याचा चेहरा उतरल्यासारखा वाटला.

"काय डॉक्टरबाबू तब्यत ठीक नाहीं वाटतं ?" माझ्या

प्रश्नाचें उत्तर न देता, ते म्हणाले, " आज काय झालें तुम्हांला नसेल माहीत ? "

' काय झालं ? ' मी जरा घाबरूनच विचारलें. माझ्या डोळ्यासमोरून दादा, रामा महार, मारोती माळी—नी अखेरीला विजय—विजय येऊन उभा राहिला. आज जुनी कबलायत रद्द व्हावयाची होती-नवी तयार व्हायची होती नाहीं का ? आणि डॉक्टरबाबूचे शब्द मला मुळींच आश्चर्यजनक वाटले नाहींत.

" मारुतीची कबुलायत शेठजींनीं रद्द करवली. मग रामाची कबुलायत करायला घेतली. त्यानें कोर्टात साफ सागितले मी ऐशीं रुपयावरच शेत घ्यायचें ठरवलें होतें...... "

' दादा कुठें आहे ? '

" आपल्या झोंपडींत "

डॉक्टर कोर्टात झालेल्या प्रकाराचे सविस्तर वर्णन मला सागत होते; विमनस्कतेमुळें त्यातला काही भाग त्रोटकपणें माझ्या कानावर मधूनच येत होता.

दादा चरख्यावर सूत काढीत होता. त्यानें माझ्याकडे एकदा नजर टाकली. त्याच्या मुखावरचीं खेदान्यें अधिक झाकाळून आली. क्षणभरात तो पुनश्च आपल्या सुताकडे पाहू लागला.

त्याच्या त्या दृष्टीमुळें माझ्या छातीत तीर शिरल्यासारखे वाटलें मला. मी तिथले एक आसन उचलून खालीं बसलें.

त्याच्या हातातला पेळू संपल्यावर त्यानें चरखा उचलून बंद करून ठेवला.

" काय भानगड झाली दादा आज. "

" काहीं नाही. विनयला एक विजय मिळाला माझ्यावर. "

' म्हणजे ? '

" त्यानीं रामाला आणि मारोतीला चिथावलं आहे. सगळा डाव आधीं रचलेला असावा. रजिष्ट्रारसमोर मात्र तमाशा झाला सारा.

मारुतीची कबलायत रद्द झाली. रामाची लिहून झाली.

अंगठा करण्यापूर्वी त्याला ती वाचून दाखविली, तर म्हणायला लागला.

" शेत शंभरावर घ्यायच ठरलंच नाहीं—मी ऐशींच कबूल केले. "

सगळ्यानीं सागून पाहिलं, पण कुणाला ऐकेना. साहेबानीं विचारलं.

" शंभरची कबलायत फाडून ऐंशींची करायला शेठजींना वेड लागलं कारे ? "

" वेड कशाला लागेल साहेब. ह्या मारुतीचं काय ? पिपळा-वरचा मुंजा. सालाच्या अखेर चाळीस रुपये सुद्धा नसते हातीं लागले शेठजीच्या. शेठजी काय बोळ्यानीं दूध पितात; मला एरव्हीं ऐशींवर शेत द्यायला ? "

...सहजच शेठजी खूप सतापले होते. " हा काय पोरखेळ आहे कीं काय ? असे शंभर मारुती नी रामा उभे करतों " म्हणून तणतणत गेले. माझ्या साधुत्वाचाही त्यानीं समाचार घेतला. हा सगळा डाव आम्हीं सर्वांनी मिळून रचला असें त्याचें म्हणणें होतें.

मी रामाला म्हणालों, " वीस रुपयाचा प्रश्न आहे ना ? मी देतों वीस रुपये तुला. मला उगीच खड्डयांत का घालतोस तेवढयासाठीं. "

" बाबाजी, एका सालानं काय झालंय्. वायदा आवंदा चढला कीं मग उतरते काय हे मारवाडी ? पुढच्या सालीं आणखीं चढीवर बसल ना तो. "

" मग शेतासाठीं इतकी धडपड कशाला करायला लावलीस आम्हाला. आमचं म्हणणं जर तुला ऐकायचं नव्हतं—आम्हीं मूर्ख वाटत होतों तर आपलं-आपलं आवरायचं होतं. "

" तें सगळं खरं बाबाजी पण आम्ही अनाडी माणसं. आम्हाला इतकी अक्कल असती, तर सगळं सुधंच नसतं झालं. ह्या मारत्यानं वावर शंभरला घेतलंच कशाला असतं ? "

माझ्या डोळ्यापुढें लक्कन विजय आला.

" कारे ? काल तुला अक्कल नव्हती. आज कुठून आली वाटतं ?"

" हो ना बाबाजी ? आज तर मला अन् मारुत्याला समजलं कीं आम्ही एक दुसऱ्याच्या पोटावर पाय आणतों. "

" कुणी दिला तुला गुरुमत्र ? "

" तुमचा भाऊच नव्ह का बाबाजी ? "

मला नेहमीं स्वताचा अभिमान वाटतो कीं कसाही प्रसंग आला तरी माझी शांति ढळत नाहीं. पण आज मात्र मला चीडच आली. मी त्रासून म्हणालो,

" ठीक आहे, आता दुसऱ्या कोणी वावर घेतलं तर ओरडत येऊं नको माझ्याकडे. "

" कोणी घेईल कशाला झक मारायला. काल त्या पाव्हण्यानं महार–कुणबी–माळी दोन तीन वेटाळात पचाना समजावून दिल्या साऱ्या गोष्टी. आता जो वावर घेईल पाउणशेंच्या वरती त्याला वाळींत टाकतील पच..."

काहीं वेळ शातता पसरली. दादाच्या चेहऱ्यावर मानसिक वेदनाची छटा स्पष्ट दिसत दोती. मी बऱ्याच वेळानें विचारलें-

" आतां पुढे काय ? "

" प्रश्नच आहे. शेठजी रामावर केस करण्याच्या विचारात आहेत. पण त्यासाठीं ' मी शेत शंभरला घेतों. ' असं रामा म्हणाला अशा साक्षी भरायला हव्यात. पण तो तसं खरोखरच म्हणाला नाहीं. मी काय तुमच्या म्हणण्या बाहेर नाहीं. तुम्हीं काय माझ्या वाइटाचं कराल, असं मधून मधून म्हणाला तेवढच."

" मग शेटजी काय खोट्या साक्षी भरूं म्हणतात. "

" तसच जवळ जवळ. कारण त्याचं म्हणणं त्याने तसे शब्द वापरले नाहींत तरी तीच कबुलायत अभिप्रेत होती. "

" तुला साक्ष द्यायला म्हणताहेत ? "

" अजून म्हटलं नाहीं—पण त्या रस्त्यानीं चाललंय गाडं सारं. आणि खोटं न बोलण्याचं व्रत घेणाऱ्या, माझ्यासारख्या माणसाची स्थिती किती कठीण. "

होती समस्याच एक ती. साक्ष देणें लबाडी, न देणें लबाडी. आणि कुणींना कुणी नाखुष होणारच......

मलाही अतिशय खिन्न वाटत होतें. लोकसेवा करतानाही मार्गा-वरचे खडेकाटे कमी होत नाहींत. तिथेही विजयसारखे बिनबुडाचे अविचारी लोक विनयसारख्या चारित्र्यसंपन्न त्यागी माणसावर शितोडे उडवूं शकतात ! !

हे दुःखद निराश विचार मी कष्टानें मागे सारले. बाहेरून आल्यावर मी हातपाय सुद्धा धुतले नव्हते. उठून घरात जाण्याच्या विचारानें मी दाराशीं आलें. तोंच विजय दारात आला. मीही जाण्याचा विचार बदलला—विचार बदलला कसला, जमिनीला चिकटवल्याप्रमाणें माझी पावलें तेथेंच स्थिर झाली.

दुपारीं ज्या माणसाच्या अब्रूवर निखारे ठेवण्याचा प्रयत्न आपण केला त्याच्याकडे संध्याकाळीं हंसतमुखानें जाण्याच्या त्याच्या धाडसाचें नव्हे जखमेवर मीठ चोळूं पहाणाऱ्या त्याच्या मनोवृत्तीचे मला कौतुक वाटलें.

मला पहाताच तो हंसून म्हणाला, " मजे काहीं पोटाची आठ-वण आहे ? वणवण करून आलीस; तोंड तरी धुतलस ? "

मी कडवटपणें उत्तरलें " तोंड धुवून काय व्हायचं आहे ? तू आहेस ना काळं फासायला पुनश्च ! "

" अग घर पुन्हा घाणेरड होतं म्हणून कोणी झाडझूड का सोडतं ? "

मी न बोलता परत फिरलें. विजय माझ्या आसनावर बसला होता. मी दादाच्या सतरंजीच्या कडेला जाऊन बसले. त्यातच मला दादाबद्दलचा आपलेपणा आदर व्यक्त झाल्यासारखा वाटला.

क्षणभराच्या शांततेनंतर विजय म्हणाला. " उज्वल तूं खरो-खरच थकली आहेस. तूं जाऊन विश्रांति घ्यावी हें बरं. "

" हा माझा प्रश्न आहे. "

क्षणिक विचार करून तो म्हणाला,

" तुला खरं सांगूं ? मला दादाशीं बोलायचं आहे आणि तूं इथें नसशील तर बरं ! "

" तिच्या अपरोक्ष माझ्याशीं बोलण्यासारखं काहीं जगात असेल असं मला वाटत नाहीं आणि तिच्या चोरून बोलण्याची मला इच्छाही नाहीं. "

" ठीक आहे जशी तुमची मर्जी. दादासाहेब मी आज तुमच्याकडे थोडा कामासाठीं आलों होतों. "

उदासीनपणे दादा म्हणाला, " तुझं माझ्याकडे काय काम असण शक्य आहे ? आणि जर एकत्र बसून विचार विनिमयावर तुझा विश्वास असता तर तूं माझ्याकडे ह्याच्या पूर्वीच आला असतास आणि कदाचित् आज कचेरीवर झालेली लाछनास्पद घटना टाळता आली असती. "

" तें शक्य होतं तर काय हवं होत. तुझ्यासारख्या सत्यवादी साधूला जगाच्या व्यवहारात गुतवणं मला योग्य वाटलं नाही म्हणून आलों नाहीं. "

" पण माझी दुष्कीर्ती व्हायची ती झालीच ना ? तूं माझा भाऊ, तू येवढे उद्योग केलेस. सहजच लोकाना वाटतं माझंच आग होत ह्या साऱ्या प्रकरणात. "

" लोकापवादाची पर्वा कशाला करावी तुझ्यासारख्या लोकानीं. तू स्वता जर आपला व्रतभग केला नाहींस तर तुला कसले भय ? तुझ्या आश्रमात ही मंजी राहते, तुला काय वाटतं जग तुझ्यावर शिंतोडे उडवीत नाहींत. "

' विजय ! माझ्या तोंडून शब्द पडला.'

" मंजू, मी तुला आधींच इथून जायला सागितलं होतं. आता रागावून काय फायदा ? "

खरेंच काय फायदा रागावून ? बाहेरच्या धकाधकींत पडलेल्या स्त्रियानीं आघाताना तोंड देणें आवश्यक नाहीं का ?

"...अपवाद निष्कारण निर्माण करून लोकसेवेचं कार्य अस्खलित चालू शकत नाहीं. म्हणून असे अपवाद शक्य तों टाळावे लागतात. "

" तुमची लोकसेवा म्हणजे दहावीस विहिरी बाधणं, एकदोन

तळीं आणि देवळं खुलीं करणं—चारदोन शाळा उघडणं...ही लोकसेवा सोडून तुम्हीं ह्या भलत्या बाजूला गेलात कशाला दादा-साहेब ? त्या तुमच्या लोकसेवेला माझा विरोध कुठेच नव्हता.

ते जाऊं द्या. मी आज तुम्हाला साक्षीबद्दल विचारायला आलों होतों. तुम्ही आणि तुमचे आश्रमवासी सहकारी रामाच्या बाजूनीं जरूर तर साक्ष देतील काय ? "

" तूं खऱ्याचं खोटं आणि खोटयाच खरं करण्याचा विडा उचलला असलास तरी सगळं जग इतकं बारगळल नाही. " मी संतापानें म्हणालें.

मुक्त हास्य करीत तो म्हणाला, " दादाचं मनही तुझ्यासारखंच असेल. चुकलों. तुझं मन त्याच्या मनाचं प्रतिबिंब असायचं. बरं आहे उज्वलाबाई. सार जग म्हणजे तुमचा आश्रम नव्हे. खरं आणि खोट ह्याच्या तुमच्या व्याख्या सापेक्ष आहेत, हे एवढ साध सत्य तुम्हाला कळत नाहीं."

" तुला कळतं ना ? "

" तुमच्या डोळ्यावर सत्याभासाचा पट्टा नसता तर तुम्हाला हीं दिसणारीं सत्यं कळली नी वळलीं असतीं. सारा महारवाडा काय पण सारा श्रमजीवी वर्ग उपासमारीने मरतो आहे. हे सत्य तुमच्या दृष्टीपुढें नाचलें असते. त्याना गरज विहिरी-तळ्याची नाहीं; पैशाची आहे हें नितात सत्य तुम्हाला कधींच आकलन झालें असते. आणि बालकमंदिरें, बालसगोपन वर्ग काढून वेळ नष्ट करण्याऐवजीं ह्या कारखान्यातून, किंवा इतरत्र होणारे अत्याचार—ही कडू सत्यें थाबवण्याचा उपाय सत्य-अहिंसेची परवा न करताही शोधले असतेत."

" आजच्या तुझ्या उपायानीं कुठला अत्याचार नष्ट झाला ? "

" मृगाचे दोन पाऊस झाले आहेत. ते शेत आणखी पंधरा दिवस तरी कुणी घेत नाहीं. मारवाडी झक्कन तें रामाला ऐशींला देईल कीं नाहीं बघ.

आणि माझी कल्पना ह्या प्रसंगाने लोकाना संघटित कर-ण्याची आहे.

मी रात्रीं अंथरुणावर पडलें खरी पण काही केल्या झोंप येईना मनात कितीतरी विचार धुडगूस घालीत होते.

विजयला चारित्र्य नसेल. त्याने कोणाकडेही आदरदृष्टी टाकली नसेल. पण म्हणून त्याने सांगितलेल्या गोष्टी सत्य नव्हत्या का ? त्याचे मार्ग असत्याचे असतील; त्यात हिंसाही असेल कदाचित्; पण समाजातील एक कडू सत्याच्या बुडाशीं त्याने यशस्वितेने घाव घातला होता ना ?

आणि मी नी दादा काय करीत होतों ? आम्हीही सत्याची कास धरली नव्हती का ? दलितावर होणारे सामाजिक अन्यायही सत्य नव्हते का ?

दादाने व त्याच्यामुळे मी घेतलेलें असिधाराव्रतही सत्य शाश्वतच होते ना ? त्यागावाचून जग चालेल का ?

माझे विचार पलीकडे वाहवले. विजयचे शब्द मला नकळत जखमा करून गेले होते.

दादाने व मी केलेला त्याग जगाला अशक्य वाटत होता. म्हणूनच जग आमच्यावर लाछन लावायला उद्युक्त झालें नव्हते का ?

ही जगाची रहाटी आहे ? कीं प्रत्येक चागल्या वस्तूवर अभद्र आरोप केल्यावाचून त्याला रहावत नाही. ”

माझी अस्वस्थता वाढली. “ जर हे सत्य असेल तर का हा आटापिटा जिवाचा ? ”

ह्या अस्वस्थतेत मला झोंप लागली पण तीही तशीच. डोळ्या-पुढें कोण जाणें कसली कसली चित्रे नाचत होतीं.

---

## खरा मार्ग ? १०

पाऊस धुवाधार पडत होता. सकाळीं धुतलेले केस वाळव-ण्याच्या हेतूनें मी झोपडीच्या तोंडाशीं आरामखुर्ची घेऊन वारवशी बसलें होतें. माझा प्रयत्न होता वेडाच. कारण दिवसाच्या पावसानें सर्द झालेली हवा माझ्या ओल्या केसानाच ओले कर-ण्याचा संभव अधिक होता; पण आशा—

आई आतल्या बाजूला चिमुटभर भस्म नी मुठभर कापूस घेऊन बसली होती—तिच्या फुलवाती संपल्या होत्या. मी तिला 'दोन ध्रुव' वाचून दाखवीत होते. माझे अति आवडतें पुस्तक तें. मजुरांच्या कल्याणार्थ नायकानें काजू फोडणाऱ्या यंत्राच्या आकृति नष्ट केल्याचा भावमय भाग वाचता-वाचता माझे डोळे ओलावले. गळा रुद्ध झाला. मी क्षणभर थाबले. आई पूर्वीच्याच गतीनीं वातींचा दाडा जाड नी कणखर करीत असावी. मी थाब-ताच ती हंसत म्हणाली,

"तुमच्या साऱ्या कादंबऱ्यात मूर्ख माणसंच असतात वाटतं? आमच्या शिवलीलामृतातल्या गोष्टी अशक्य म्हणून नाकं मुरडता. पण हीं माणस त्याच्यापेक्षा काय ग निराळीं आहेत."

माझ्या डोळ्यातलं पाणी काजळ काठावर ओसरल्याने मला आईचा चेहरा स्पष्ट दिसत होता. त्याच्यावर अनेक दुःखानीं कठोर मुद्रा केल्या असल्या, तरी वत्सलतेच्या कोमल भावनेनें त्या पुसवटल्या होत्या. तिच्या चेहऱ्याकडे पहाता-पहाता माझ्या मनात आलें ख्रिस्त, कृष्ण, बुद्ध ह्याच्या चेहऱ्याभोंवती जी प्रभावळ काढतात, ती हीच का खरोखर?

ती मला सागत होती; "आपली छाती मोठी कोती—तुझ्या त्या पोराला ( नायकाला ) वाटतं आपण काजूचं यंत्र तोडल कीं दुसरा करायचाच नाहीं कधीं.

मामजी म्हणायचे 'अस्सा देश बुडवला आम्हीं. औषधं काय गुप्त ठेवा–मत्र काय सागूं नका, कला काय घरातच राहूं द्या..."

मी तिला हंसून काहीं उत्तर देणार इतक्यात दादा पावसातून येऊन छत्री मिटीत म्हणाला,

"मामी, वाती करायच्या ऐवजीं सूत काढा."

"माझा देव वाती मागतो, मी वाती करतें. तुझा देव सूत मागतो तूं सूत काढ." तिनें एक निःश्वास टाकला—तिच्या उज्वल चेहऱ्यावर एक तमच्छटा पसरून गेली 'कां? कां बरं?' मी मनाला विचारलें.

आईच्या जवळ बसून दादा म्हणाला,

" उज्वल, नथुमलच्या केसबद्दल आज कांहींतरी अखेरचा निर्णय केला पाहिजे. त्याला उत्तराची निकड आहे. आणि केस करायची का नाही हें माझ्या उत्तरावर अवलंबून आहे."

दादाच्या शब्दाचे मला आश्चर्य वाटलें. इथे वादाचा-विचाराचा प्रश्न उद्भवतो हें मी विसरलेच होतें. आई मात्र म्हणत होती.

" त्या गरिबाला कशाला खड्डयात घालता रे. भाडणाचं तोंड काहीं लहान असत. सगळीं गाडगीं-मडकीं रस्त्यावर येतील बिचाऱ्याचीं."

दादानें तिच्या शब्दाकडे लक्ष दिले नाही. तो माझ्याकडे पहात होता.

" तू साक्ष कशी देणार? त्यानीं शभर रुपये द्यायचं कबूल केलं नाहीं ना स्पष्ट?"

" त्याची नियत वाईट आहे. त्याला शिक्षा व्हावी अशी माझी इच्छा नव्हती किंवा अजून नाहीं. माणूस आहे तेथे प्रकृतिभिन्नता असणारच. पण कायद्याच्या परिभाषेचा फायदा घेऊन दुसऱ्याला बुडवण्याची त्याची इच्छा अश्लाघ्य खास आहे. त्यानें आपसात मिटवावें असा प्रयत्न मी गेले १५ दिवस करतों आहे. पण त्याचा हट्ट कायमच आहे. आपण वीस रुपये भरायला तयार असताना त्याचा हा हट्ट आणखींच अन्याय नाहीं का?"

" जगात असे किती अन्याय होत असतात दादा. हे अन्याय दूर करण्याचं व्रत आपण घेतलंय मला कबूल. परतु त्याच्यासाठीं " सत्य व अहिंसा " एकच मार्ग आपण पसत केला नाहीं का? आज एक अन्याय दूर करण्यासाठीं तूं खोटी साक्ष देशील. पण तुझ्या सत्यनिष्ठपणावरचा लोकाचा विश्वास उडणार नाही का?"

" मी केव्हाही खोटं बोलणार नाहीं; एवढा विश्वास निदान तुला असूं दे उज्वले. इथें प्रश्न आहे तो असत्याविरुद्ध सत्य असा दिसतच नाहीं मला. सत्याविरुद्ध सत्य! असाच पेंच नाहीं का? रामाची बाजू तात्त्विक दृष्टया बळकट असली तरी

नैतिक-तात्त्विक बळ नथुमलकडे नाहीं जात का ? सत्याचा शोध करणारानें त्याची नैष्ठिक उपासना करून भागेल का ? त्याला तर खोल पाण्यात शिरूनच काय तो निश्चय करावा लागेल. ”

दादाच्या शब्दाचा अन्वय अर्थ लावूनच मी विचारलें “ तूं नथुमलकडून साक्ष देणार तर. ”

“ मला वाटतं तस करणं भागच आहे. मी पुढें बोलले नाहीं. पुष्कळसे निर्णय प्रथम करून मग ते इतरावर लादण्याची वहिवाट मला जुनीच होती. साक्ष मला द्यायची असती, तर अधिक बोलणे, मला प्राप्तच झाले असतें...”

वाचेला बाध घातला म्हणून मनाला का बंधन घालता येते ? मी पुनः पुन्हा मनाला विचारीत होते; “ सत्याची पूजा हे मानवी जीवनाचें ध्येय होऊं शकतें का ? आताच दादाने सत्याचे तात्त्रिक व तात्त्विक असे दोन भेद केले ना ? आणि जीवनाचीं ती सत्यें ? कोणीं पारखायची ? जग ही काय प्रयोगशाळा म्हणून प्रत्येक सत्य–निर्भेळ सत्याची शाश्वति देऊन–मान्य करता येईल.

अखेर हें ‘ सत्य सत्य ’ काय आहे तरी ? प्रत्येक सत्य हे पहाणाराच्या दृष्टिकोणावर अवलंबून असायला पाहिजे नाहीं का ? आणि हजारों लोकाचा दृष्टिकोण एकच झाला; त्याना विशिष्ट प्रसंग, स्थळें, परिस्थितीनीं एकच वाटल्या तरच त्याना ‘ सत्य ’ म्हणूं ना आपण ?...

परमेश्वर सत्–चित्–आनंद आहे. पण परमेश्वराचा अनुभव आहे कोणाला ? हेंच तर सत्याचे स्वरूप ? केवळ तात्त्विक चर्चा ?...

जगात काय आहे तर मग ? केवळ जीवन कलह ? आणि त्यातून निर्माण होणारीं दुःखे ?

‘ जीवो जीवस्य जीवनं ’ ! !

माझ्या स्तब्धतेमुळें दादाचा निर्णय मला मान्य नाहीं हें त्यानें जाणलेंच आणि दहापंधरा मिनिटें स्वस्थ बसून तो निघून गेला.

...दादाचा अजून पुरता निश्चय झाला नव्हता म्हणा किंवा माझ्या विरोधानें तो परत डगमगला म्हणा–पण निश्चयानंतर

येणारी शातता त्याच्या वर्तनात मला आढळेना. नथुमलचा माणूसही दोनदा येऊन गेला. मी ह्या भानगडींत न बोलण्याचा निश्चय केला होता; आणि माझ्या मनोमालिन्याचा वास येऊनच कीं काय दादाही मूक होता.

तिसरे दिवशीं महारवाड्यात मला जो तो दादाच्या साक्षीबद्दल विचारू लागला.

जिवबा नि शिवाजी दोघेही वृद्ध बाहेरच चिलीम ओढीत होते. मला पाहून जिवबानें तोच प्रश्न विचारला.

" जिवबा तुम्हींच बोलल्या बोलाला जागला नाहीं. त्याला 'बाबा'नीं काय करावं ? "

" बाई दुनियादारीं अशीच चालते. बाबासारख्या साधू माणसानीं त्यात पडू नये ते बरं. "

" पण त्या साधू माणसानीं खटपट केली तेव्हाच नथुमलनीं कबलायत रद्द केली तेव्हा का नाहीं सुचल तुम्हाला हे सारं. कबलायत नसती रद्द करवली तर काय करणार होता रामा नी तुम्हीं ? "

" बाई आम्ही अडाणी माणसं. कोणी समजाऊन सागितल तर समजतं आम्हाला. तो अन्नदाता—त्याने हात जोडून वर नजर भिडवली—भेटला म्हणून त्यानं आम्हाला रस्ता दाखवला..."

पण जिवबाचे सारे शब्द मला ऐकायला येणं अशक्य झालं, कारण शिवाची मुलुखमैदान तोफ घनघोर गर्जत होती.

" बाबानीं नसती रद्द केली तर काय बिघडलं असत. आहे काय त्या मारुत्याजवळ. शेत सालभर खाऊन त्या तीनशेड्याला हात दावला असता. "

" अजून काय झालंय्. आता तर सारी सुरवात आहे. पाहूं बाजी कशी जिकता ते. "

" आम्ही तर जिकूनच दाखवू. आता विड्याच्या कारखान्यात ' संप ' करून दाखवतों × × नी फोलून खाल्लं गरीबाना "

इतक्यात घरातून एक सोळा सतरा वर्षांचा मुलगा बाहेर आला;

" बाबा तूं जीव कशाला कोरडा करतो. ही त्या बाबाचीच बहीण आहे. "

त्याचे ते शब्द माझ्या जिव्हारीं लागले. मी जरा कुर्यानेंच म्हणालें. " बाबाची मी बहीण तशीच त्या साहेबाचीसुद्धा बहीणच आहें. "

आणि मग माझेंच मला आश्चर्य वाटलें. ज्या विजयबद्दल मला केवळ परकेपणा नव्हे तर एक तिटकारा वाटत होता त्याच्याशीं नातें जोडण्याचा हा प्रयत्न !!

—परत आल्यावर मी दादाकडे गेलें. आज माझ्याच्याने रहावेना. मी त्याला एकंदर अनुभवाचा निष्कर्ष सागितला.

" साक्ष देण्याचा माझा हट्ट नव्हताच कधीं उज्वल. "

" मग काय चालवलं आहेस हे ? " मी साक्ष देणार नाहीं म्हणून नथुमलच्या माणसाला स्पष्ट सागितलं, पण त्याचा निरोप आला कीं मी तुमची साक्ष भरणारच. तुमच्या सत्यवादीत्वावर माझा पूर्ण विश्वास आहे. साक्ष काढून कोर्टात गेल्यावर साग काय करूं ? असत्य बोलूं ? पटत नाहीं मनाला तें. महार बिथरतील ह्या भीतीनें तर नाहींच नाही. त्यापेक्षा ह्या आश्रमाचे वाटोळें झालें तर काय वाईट ? "

दादाच्या शब्दातला जोर मला समजला. मला चारुदत्ताचे शब्द आठवले.

न भीतो मरणादस्मि, केवलं दूषित यशः
विशुद्धस्य मे मृत्युः पुत्रजन्मसमः किल

मी बराच वेळ विचार करीत होतें. मी अखेर दादाला म्हणालें, " तूं कोर्टात जाऊन साक्ष न देण्याचा सत्याग्रह केलास तर ? "

तो बराच वेळ विचार करीत होता, " कल्पना वाईट नाहीं. नाहींतरी ब्रिटिश कायद्यावर आमचा विश्वास नाहींच. Contempt of court खालीं होईल. चार सहा महिने जेल. त्याचाही बाऊ नाहीं. पण...

सध्या कॉंग्रेसनें सत्याग्रह थाबवला आहे. अशा वेळीं सत्याग्रह करतां येईल का ? "

" काँग्रेसनें व्यक्तिगत सत्याग्रहाला बंदी करण्याचं काय कारण ? सत्याग्रह हा आपला धर्म आहे—जसं सिखाचं कृपाण ! "

दादा त्या छोट्याशा खोलींत जोरजोरानें फेऱ्या घालीत होता, तेव्हा तितक्याच जोराने त्याचं विचारचक्र सुरू असल्याचा अंदाज मी बाधला तर काय नवल ?

---

## शेवटचा अंक ११

ह्या सगळ्या विचित्र नाटकावर शेवटचा पडदा अनपेक्षितपणें पडला. आणि त्याचा अंतही तितक्याच चमत्कारिक आणि विचाराना चालना देणारा झाला.

मी रोज वस्तींत जायची. कित्येकदा सात्विक संतापाने, कित्येकदा प्रेमाने तर केव्हा केव्हा प्रौढीमुळें, नव्या योजना माझ्या कानावर घातल्या जात. हें सगळें नाटक कायद्याच्या शब्दचमत्कारावर उभारलेलें होतें. आणि नवे बेत करताना, कायद्याची आधळी चौकट कशी पार पाडता येईल ह्याचा ती मंडळी कितपत विचार करीत कोण जाणें.

नथुमल केस करणार अशी खात्री होताच केस लढायचें तर ठरलें. त्यासाठीं वर्गणी करण्याचाही बेत झाला. इतकेंच नव्हे, केस हरून रामावर डिक्री झाली तर ती वसूल होऊं नये म्हणून निरनिराळ्या युक्त्याचा विचार होऊं लागला.

रामानें आपला जंगम माल जप्तीपूर्वी हालवावा आणि घर व जनावरें आऊतें वगैरेंचें खोटें खरेदीखत एखाद्या विश्वासू सोबत्याचे नांवें करावें अशी एक कल्पना होती.

साऱ्या इस्टेटीचें इनामपत्र बायकोच्या किंवा मुलाच्या नावें करावें अशी दूसरी सुचना होती.

साक्षिदार फोडण्याच्याही गोष्टी सुरू होत्या...

नथुमलची बाजू आम्हाला पुरेशी समजत नसली; तरी अधूनमधून त्याच्याही बेताचा वास लागे.

मारुतीला फितवण्याचे बेत झाले. मारुती आणि रामा ह्याच्या मारामारीचें प्रेत उकरून रामावर फौजदारी करावी असाही एक विचार चालला होता.

माझे काम चुपचाप ऐकण्याचें होते आणि तें मी व्यवस्थित बजावीतही होतें.

...हे सगळे बनाव बनायला नी मोडायला धड हप्ताभरसुद्धा लागला नाहीं.

नथुमल शेठजींना नवा भागण मिळाला नव्हता येवढें खरें, मग त्याला कारण लोकाची संघटना असो वा रामा व त्याच्या साथीदाराच्या लाठ्या असोत.

...मृग संपून आर्द्रा लागल्या होत्या. आर्द्राचा पाऊस जोरदार धो-धो पडायचा. त्यात आर्द्रा यदा हत्तीवरून आल्या होत्या म्हणे—निदान त्या ज्या जोमानें पडत होत्या त्यावरून मला तसें वाटत होते.

मी अशीच झोपडीच्या दाराशीं वाचीत बसलें होते. पुस्तक अगदीं नव्या धर्तीचें—विषय मला नवा, म्हणजे अर्थ शास्त्राचा ! मला तें काहीं केल्या समजेना. मात्र लेखकाने—त्यावेळीं त्याच्या नावाचेंही स्वारस्य मला समजले नाहीं.—मधून मधून दिलेलीं उदाहरणें मात्र मला आवडली आणि क्वचित् मी त्याचें भाषातर करून आईलाही सागत होतें.

नवीन शोधामुळे आपल्या कारखान्याचा नफा उतरेल ह्या भीतीनें नव्या शोधाचे हक्क विकत घेऊन, ते आविष्कार दडपून टाकणाऱ्या कारखानदाराचीं उदाहरणें मला आश्चर्यजनक वाटलीं; आणि दुष्टही. फक्त नवे शोध आणि जुना नफा ह्याचीं नातींगोतीं मात्र अखेरपावेतों कळलीं नाहींत.

शंभर रुपयावर १५० रुपयाचा नफा वाटणारे उद्योगधंदे; आपले प्रतिस्पर्धी नेस्तनाबूत होईतों तोट्यात माल विकून मागून किमती भरमसाट वाढवणारे व्यापारी...शेवटचे उदाहरण तेवढे मला आकलन झालें. हिंदुस्थानच्या किनाऱ्यालगतच्या वाहतुकीवर

अशाच तऱ्हेची स्पर्धा एकदा सुरू होती—म्हणे. प्रथम कंत्राटदार इंग्रज कंपनीने आपले भाडें उतरवून खूप कमीं केले. हिंदी कंपनी चार सहा महिन्यात दिवाळें काढून बुडताच ते भाडें मूळ भाड्याच्या तिप्पट करून मागची भरपाई केली. असेंब्लींत हाजी बिल आलें असताना; बहुधा दादानेच मला ही माहिती दिली असावी. कसेही असो मला त्याची आठवण झाली खरी. आणि आता ते पुस्तक समजाऊन घेण्याची उत्कंठाही वाटूं लागली. मी पुस्तकात बोट घालून पुस्तक मिटले; आणि मनाशीं काही विचार करीत होते. इतक्यात त्या धुवाधार पावसातून घोंगडी लपेटून घेऊन एक व्यक्ती वर आली.

रामाने—रामाच होता तो—घोगडी झटकली. चागली भिजली होती ती. आई त्याला विचारीत होती;

" कारे रामा इतक्या पावसात भिजत कशाला आलास ? "

" शेरणी द्यायला. तुम्हाला आमच्या हातचं बनत नाहीं. बाई तर खाईल. " त्याने आपल्या ताबड्या पागोऱ्याच्या कोपऱ्याला जपून बाधलेला पुडा काढून पुढे टाकला.

" बाईवर आमची फार भक्ती आहे. पुष्कळ आउक्ष लाभो बिचारीला. " तो कानावर बोटें मोडीत म्हणाला.

" ते खरं रामा, पण कसली शिरणी देतो आहेस ? "

" तुम्हाला नसत कळलं. शेताचा कागद झाला. "

" कागद ? कसला कागद ? "

" कबलायत लिहून घेतली नथुमल शेटान."

" कधीं ? वायदा किती दिला रे ? "

" आताच लिहिली ना बाई ! वायदा ठरला सत्तर अन वऱ्हं पाच."

" पंचाहत्तर ? " मी आश्चर्याने उद्गारलें " खात्री आहे तुझी ? तुला वाचता तरी येतं रे ? "

" बाई, साहेब होते ना तिथें ? त्यानीं वाचली ना सारी कबुलायत ! "

ही वार्ता इतकी अनपेक्षित आणि अशक्य होती—मला विश्वासच वाटेना.

संध्याकाळपर्यंत इतर मंडळीकडून तीच बातमी मिळाली. शेत शक्य तितक्या लवकर देणं जरूर होते. नाहीं म्हणजे त्या वर्षी ते पाडून ठेवावें लागलें असतें. शेत बरडापैकीं असल्यामुळें त्यात रब्बीचें पीक निघत नसे. नथुमलशेटजींना शेत पाडून ठेवून सत्तर पाऊणशें रुपयाचे नुकसान करणें पटले नसावे.

कसेंही असो. आज विजय विजयी झाला होता. काळ म्हणत होता. विजयची कृति ठीक आहे. आणि सदैव नैतिक मूल्ये पारखून घेणारी माझी मनोवृत्ति विचारीत होती;

" हें नितात सत्य आहे ना? महत्त्व कशाचे? ध्येयाचें का मार्गाचे? सर्व मार्ग एकाच परमेश्वराकडे जातात खरे. म्हणून त्यापैकीं कुठलाही मार्ग श्रेयस्कर आहे?

रावण स्वर्गाला गेला, दुर्योधन स्वर्गाला गेला. पाडव आणि रामचंद्र ह्यानीं तरी जास्त काय साधलें? मग का हा सत्याचा—नीतीचा अट्टाहास?

ह्या विचारानें माझे अंग शहारले. स्वताचीं मुले उपासमारीनें जर्जर होऊन मरताना पाहून पित्याचे हृदय कळवळले—आणि पिंजऱ्यात बद केलेल्या त्या वाघानें आपलीं नखे काढून, शेजाऱ्याच्या सोबत्याला रक्तबंबाळ केलें, आणि त्या रक्तावर आपल्या अनागस अर्भकाचे प्राण वाचवले!...ध्येय!—ध्येय—उच्च आणि योग्य आहे. पण—पण त्या ध्येयाला पोंचण्याला आवश्यक असा एकच मार्ग—शेजाऱ्याची हत्या. योग्य आहे ती?

एक मन म्हणत होते " निद्य व घातकी समाजाची धारणा नियमांनीं होते. प्रत्येक व्यक्ति नियम तोडून बाहेर जाईल तर समाज नष्ट होऊन गोंधळ माजेल. आणि मानवानें संस्कृति एकत्र केली ती सुद्धा नैतिक मूल्यासाठीं प्राण समर्पण करणाऱ्या सहाय्यानेंच ना? त्या नैतिक मूल्याची राखरागोळी केल्यावर पुढें काय?—तेंच पशुजीवन!"

पण दुसरें मन हळूच विचारीत होते. " मनुष्य हा स्वभावतः हिंस्र आहे का ? सारे हिंस्र क्रूर पशू एकएकटें जीवन कंठितात. मनुष्य समाज प्रिय आहे. कळप करून रहाणारे प्राणी परस्पराची हत्या करीत नाहींत. परस्परात प्रेम करतात. माणसाचा स्वभावही प्रेमळ असणेंच जास्त शक्य आहे ?

मग ह्या हत्या—ही हिंसा कुठून निर्माण झाली. का संस्कृतींच्या मागे येणारा तो आवश्यक दुर्गुण आहे ?...

ज्या समाजात असहाय्य, दुर्बल मुलाना दैवावर अवलंबून रहावें लागतें, तो समाज आधींच पशूपेक्षा हीन कोटीला पोंचला आहे ना !

असे विचार फार आले, म्हणजे मी विचाराचा कप्पा थाववून दुसरीकडे लक्ष घालीं.

एक विजय हातीं आल्यापासून महार मंडळींचा जोर वाढला होता. ते अतिशय खुशींत होते. विडीकामगारही आता स्वताच्या मागण्या पूर्ण करून घ्याव्या असा विचार करीत होते. पत्रावळीवाले पत्रावळीचा दर वाढवूं म्हणत होते...आपली मिळकत पै-पैशानें वाढवण्याचे त्या दरिद्री लोकाचे ते भगीरथ प्रयत्न पाहिले म्हणजे त्याची करुणा येई.

...आई विजयवर खुष होती. " तू नी विजय विद्वान असाल, हुशार असाल, पण विजयला व्यवहार कळतो. तुम्हा दोघाना तेवढें नाही समजत. "

आणि खरेच होते ते ! नाहीतर स्वताच्या जीवनाचा होम करून जगाच्या चवाठ्यावर पाणपोई आम्ही कशाला घातली असती ?

जगाने काहीं म्हटलें—काळाने काहीं निर्णय दिला तरी दादा व मीं अजून ढळलों नव्हतों. माझ्या मनात क्वचित् बंडखोर विचार येत; पण ते लवकर जिरून जात.

" आपले कर्तव्य आपण करावें. फलाची चिंता काळ वाहील"

......एके दिवशीं रामा मला सागूं लागला.

" बाई, मारवाड्यानं मोठ तंग आणलय् बघा. "

" का रे ? आता तर कबलायत तुझ्या मनासारखी झाली. काय त्रास देतो तुला आता तो ? "

" आम्हीं गरीब माणसं आमच्याजवळ नगद पैसा नाहीं. आणि शेतीच्या दिवसात रोख पैसा तर घडीघडीला पाहिजे. बी-बियाणा-साठीं पैसे काढायला गेलों तर देत नाही म्हणतो. "

" ते तर बरोबरच आहे त्याच. त्याच्या नरड्यातून तुम्ही जमीन ओढलीत. तो दात सोडतो का आता ? "

" त्याचा काहीं इलाज सागा तर बर ! "

" तुझे साहेब कुठें गेले ? "

" काय जणं ! पाहिलेच नाहीं हप्त्या-भरात. "

विजय बाहेरगावीं गेल्याचें चौकशी करता आढळलें. त्याने आपला पत्ता कुणाला दिला नव्हता. पुढच्या संघटनेचे बारा वाजणार हें उघड होते.

दिवस व्यतीत होत होते. दादाने रामाच्या प्रकरणात हात घालण्याचे साहजिकच नाकारलें. नथुमलची कटकट चालूच होती त्यावर कुणाला ' इलाज ' सापडत नव्हता.

"शक्तीच्या प्रयोगाने मिळालेला विजय चिरस्थायी होत नाहीं. त्याला हृदयपालटच व्हावा लागतो. "

मला हें तत्त्व एकदम आठवलें नी बऱ्याच अंशीं पटलेही.

कोण जिंकले अखेर ? नथुमल का रामा ? रामाला 'घी' दिसले, पुढचा बडगाही दिसता तर शेत घेण्याचा अट्टाहास तो करता काय ?

विजय कुणाला मिळाला विजयला का विनयला ? आज तरी विजय बेपत्ता झाला होता; इतकेच नव्हे तर विनयचीं तत्त्वे विजय पावलीं होतीं.

लोकामध्यें एक जागृति झाली असली तरी ती परत सुप्त होण्याच्या मार्गाला होती. आणि त्या जागृतीचें महत्त्व किंवा मूल्य निदान मला आकलन करता येत नव्हतें.

---

*

# नवे रस्ते १२

" कराग्रे वसते लक्ष्मीः करमूले सरस्वती
करमध्ये तू गोविंदः प्रभाते करदर्शनं. "

आईच्या गोड आवाजातले शब्द मी ऐकले, आणि हातावर हात चोळल्याचा आवाज झाला; दिवा नसतानाही त्या अंधेरात तिने हात चोळून हाताचे दर्शन घेतल्याचे माझ्या कल्पनाचक्षूंना दिसले.

ती तोंडानें भूपाळ्या म्हणत होती.

"उठि, उठि बा पुरुषोत्तमा,
भक्तकामकल्पद्रुमा,
आत्मारामा, निजसुखधामा "

हातानें तिचीं कामें चाललीं होती—अंथरुण गुंडाळूण ठेवले, तोंड धुतले, चुलींत पेटत घातले.

भागू आल्याचे निरनिराळ्या आवाजावरून मी ओळखले. तिने आगण झाडून सडा घातला व आता मोरींतल्या भाड्याची उस्तवारी करीत असावी.

आईने माघ स्नान सुरू केलें असल्याने ती लवकर ४ लाच उठत असे. नक्षत्रे मावळण्यापूर्वी स्नान करावयाचे आणि आन्हिकें उरकून म्हणजे इतक्या लवकर उठावेच लागे. मी बहुधा तिच्या आवाजानें जागी होई. आणि तिच्या मधुर भूपाळ्या ऐकून पडून राहीं.

पहाटेची मंद शीत झुळूक वाहूं लागल्याने मी पाघरूण अधिक लपेटून घेतलें. चेहेऱ्याला मात्र तीव्र थंडावा जोमदार वाटला. आई बहुधा परसूदारीं फुलें काढीत असावी. आत येताना तिचा आवाज पुनश्च स्पष्ट येऊं लागला.

उठूनिया प्रातः काळीं
वदनी वदा चंद्रमोळी
बिंदुमाधवा जवळी
स्नान करी गंगेचें "

बिचारा चंद्रमोळी ! अखेर सकाळीं उठून बिंदुमाधवाजवळ गंगेचे स्नान करणें त्याच्या कपाळीं.

मी खुदकन हंसलें. आईच्या कानावर तें पडले असावें.

" का ग जागी आहेस का स्वप्नात हसती आहेस. "

मी आळेपिळे देत म्हणाले, " स्वप्नच पडत होतें. मला किनई आई देवानीं विमान पाठवलं स्वर्गातून. "

" काहींतरीच बडबड तुझी "

" अं स्वप्नं अशींच असतात आई. आणि बर का—मी तुला नमस्कार करायला आलें तर तूं म्हणालीस 'मंजे एकटी नको जाऊंस; मला येऊं दे.' मी म्हणालें " अग आई आपल्या जवळ एकच तिकिट आहे. दोघींना कस जाता येईल ? "

तू म्हणालीस " मग मीच जातें. मी झाले म्हातारी. माझे झाले देवाकडे जायचे दिवस " तर तो देवदूत म्हणायला लागला कीं बाई तिकिट ट्रान्सफरेबल नाहीं. म्हणजे दुसऱ्याना चालत नाहीं"

" कसली—वेडीविद्रीं स्वप्न हीं. जरा देवाच नाव घे—म्हणजे नाहीं दिसणार असं काहीं. "

मी अंथरुणावर उठून बसले; व अंगात गरम अडकवीत म्हटले;

" तूं फारच घाबरट आई. तुला स्नानाला उशीर होईल. तू आघोळ करून ये. तोंवर मी स्टोव्ह पेटवून दूध तापवते. "

मी तोंड धुवून घरात आलें. तों आई शेगडी पेटवून दूध तापत ठेवून स्नानाला गेली होती.

दूध उतरून ठेवून मी शेगडीशीं शेकत बसले—पारोसें पाणी आईला चहाला चालणें शक्य नव्हते. नी जवळ पडलेल्या सनकाडीनें कोलत्याशीं खेळूं लागलें.

मला आजोबाची आठवण झाली. म्हातारपणामुळें त्याची थंडी कपड्यांनीं भागत नसे. ते नेहमीं शेगडीपाशीं शेकत बसत. आणि मुलं कोलत्याशीं खेळायला लागलीं कीं विचारीत,

" कोण खेळतंय कोलत्यांशीं ? काय होतं कोलत्याशीं खेळून ?"

" अंथरुण ' भिजतं ' रात्रीं " आजही नकळत माझ्या तोंडावर उत्तर आलें मी हंसून सनकाडी विझवली.

मनाची गती किती विचित्र आहे. एका वस्तूवरून दुसरीवर तें किती सहज जातें.

आजोबावरून बालपणावर, तेथून दादावर व नंतर आश्रम जीवनावर तें लीलेने उडालें. गेल्या सहासात महिन्यांत आश्रम किती बदलला आणि त्या बदललेल्या परिस्थितीमुळेंच मी घरीं परत आले ना ?

आईला किती आनद वाटला, घराला आले तेव्हा. श्रीराम वनाहून परतले तेव्हा कौसल्येला असेच काहीसें वाटलें असेल. आईच्या प्रेमळ भोळया मनाला वाटत होते सन्यासमार्गांकडून माझी मंजू एक पायरी परतली. तिच्या कलाकृतींत हे समाधान स्पष्ट दिसत होते.

इतका तिला आश्रमाचा तिटकारा होता ? निदान निःसीम अश्रद्धा खचित होती. तरी आपल्या अपत्याच्या सुखासाठीं कल्याणासाठीं तिने तेथे सहा महिने काढले ना ? तिच्या त्यागाचे मला कौतुक वाटले पण त्यापेक्षाही तिच्या औदार्याचें आश्चर्य !

वृद्ध वयाबरोबर मनाची गंभीरता व उदारता वाढत जाते का ?...

आई घरात येऊन लुगडें घेत होती. तिच्या तोंडातून गंगास्तोत्र अस्पष्ट ऐकू येत होतें.

" नमामि गंगे तवपादपंकजं
सुरासुरैर्वंदिति दिव्यरूपं..."

चहाचा कप उचलून मी माजघरात झोपाळ्यावर येऊन बसले. आई पूजेच्या तयारींत होती.

माझ्या विचाराची शृंखला अजूनही तुटली नव्हती. आपण आश्रम सोडला ठीक केलें ना ?—आणि त्याचा अर्थ तरी काय ? दादाबरोबर जातांना जगानें मळवलेला रस्ता मी सोडला होता ना ? का तो एक भ्रम होता ? मळलेली पाऊलवाट सोडायची तर प्रवाशाला मिळणारी संगत, इतक्या सहज सोडून भागेल का ? अगदीं एकट्यानें मार्ग आक्रमण करणें आपल्याला शक्य आहे का ?

माझ्या डोळ्यासमोर आश्रम सोडण्याचीं सारीं कारणं–मालिका आली. निरूचा चेहरा त्यात किती ठळक दिसत होता....

...निरू आणि किसन—किसन नी निरू; 'गंधर्व' होताच किसन तिला घेऊन पाया पडायला आला होता. हळदीने माखलेली निरू, तिच्या उजळ रंगामुळे रसरसलेल्या लिबासारखी तिची काति खुलली होती. कानोळ्या घेऊन, कपाळावर पट्ट्या चोपून काढून घातलेले तिचे मऊ केस, कपाळावर ह्या कानशिलापासून त्या कानशिलापर्यंत रेखलेली लाल भडक कुकवाची चिरी, नेसूनचा नवा हिरवा रास्ता,—त्याची लालभडक किनार किती खुलून उठली होती. पायात मोठमोठ्या कोऱ्या झिलईच्या साखळ्या होत्या. हातातल्या कोऱ्या दडवेळा, कडी पाटल्या नी गळ्यात सरी व तिच्या बाजूला जाड-जड नवी साखळी. सगळा शृंगार चादीचा. नवयौवनाने रसरसलेल्या निरूच्या देहावर कसा खुलून उठला होता.

आईने दोघाना बसायला काबळें दिलें. किसन बसला, निरा बसेना. लाजेने तिचे गाल लाल झाले. तिच्या त्या सौंदर्याकडे न जाणे कसल्या अभिलाषेनें—मी वेड्याप्रमाणे पहात होते. मी चित्रकार असते, तर माझी प्रेमदेवता मी तिच्या वेषातच रंगवली असती. आज मला समजलें—नव्हे उमजलेंही—की कामदेवाला प्रणयक्रीडा करायला कॉलेज किंवा कादबऱ्या लागत नाहींत. आणि यौवनाचीं सुंदर फुलं जंगलानींसुद्धा उगवतात.

आईनें त्याना शिरा खायला घालून त्याचं तोंड गोड केलें.

"काय किसन बायकोच नाव घेतो का?"

खरेंच नाव घेण्याचा समारंभ मला आठवतही नव्हता. किती लाज वाटत होती दोघानाही. किसनही आज आपलेपणात वाटत होता....

किसन आणि निरू गेल्यावर सात्विक व निरागस आनदाचें तें मनोहर प्रतीक माझ्या मनांत कितीतरी वेळ टिकून होते.

किसन जवळच्या महारवाडींत रहात होता. त्याच्याजवळ थोडी शेती भाती होती पोटा पुरेशी.

त्याची आई लहानपणीं मेली. बापाने गंधर्व केला तेव्हा त्याची आजी त्याला आपल्या घरीं घेऊन गेली. तेथें किसन आणि निरू एकत्र वाढली. कारण निरूचा बाप नी किसनचा मामा दोघे मोठे दोस्त होते. आणि दोघेही शेजारीं–शेजारीं रहात असत. किती तरी वेळा दोघानीं शेताची राखण केली होती. अंब्याखाली राखणी करताना रात्र नी दिवस एक केली होती, घरून मीठ आणून पडीच्या कच्च्या कैऱ्या मिटक्या मारून खाल्ल्या होत्या.

किसन नी नीरू—जातीच्या रीतीप्रमाणे दोघाचेही विवाह बालपणींच झाले. त्याच्या अजाण विशुद्ध प्रेमात, त्या लग्नाची अडचण कधीं आली नाहीं.

दहा वर्षांच्या वयाला निरू विधवा झाली. थोडेंसें रडणे-ओरडणे झाल्यावर निरूच्या मंडळींचा शोक संपला. निरू परत जुने जीवित आक्रमण करायला मोकळी झाली.

त्याच सुमाराला किसन बापाकडे परत आला. त्याच्या दुसऱ्या आईला मूळबाळ नव्हते. बापाला कसलासा रोग लागून तो आजारी झाला होता. सहजच किसनवर ससाराची धुरा उचलायची जबाबदारी आली.

—त्यानंतरच्या सहा वर्षात किसनच्या आयुष्यात पुष्कळ घडामोडी झाल्या. त्याच्या दुखणेकरी बापाने इहलोकाचा निरोप घेतला. किसनची बायको शहाणी होऊन घरीं आली. किसनचा ससार जोमात सुरू झाला. घरची जमीन—घरचे काम करणारे; पावसाची साधारण बरी दृष्टी राहिल्याने किसनला बरकत येत गेली.

त्याच्या बायकोची शरीरकाठी पुरेशी काटक नसल्यानें, ती नेहमीं आजारी पडे, येवढीच काय ती उणीव, त्याच्या आयुष्यात होती.

गेल्या हिंवाळयात बाळंतपणात त्याची बायको मेली; आणि पुनश्च घर ‘ वसवण्याचा ’ प्रसंग किसनवर आला.

तो निरूला विसरला नव्हता. कुठें तरी एका कोपऱ्यांत तिची स्मृति सुप्त असावी. गंधर्वाचा प्रश्न उभा रहातांच त्यानें प्रथम

निरूचा विचार केला. इतके दिवस ती लहान असल्यानें अजून तिचा गंधर्व तिच्या बापानें केला नव्हता. आता ती आपलेपणात आल्यावर—तिच्या बापाचा विचार तिला उजवण्याचा होता.

किसनने आपल्या मामाकडून लागलीच तिला मागणी घातली. पण लग्न म्हणजे एक सौदाच. स्त्री ही पुरुषाची मालमत्ता—तिला स्वतंत्र अस्तित्व नाहीं. त्यामुळें देशकालविशेषाप्रमाणें ह्या सव-द्याच्या तऱ्हा बदलतात एवढेंच.

समाजाच्या खालच्या थरात स्त्रियाची संख्या कमी, त्याची अर्थोत्पादन करण्याची पात्रता जास्त. वैद्यकीय मदतीच्या व शिक्षणाच्या अभावीं तरुण स्त्रियाच्या मृत्यूचें प्रमाण फार. त्या-मुळें स्त्री ही अत्यंत मूल्यवान होऊन बसलेली आहे. त्यात निरूसारखी गेल्याबरोबर "ससार उचलणारी" तरुण स्त्री तर जास्तच महाग होते. अर्थात् निरूच्या बापानें तिची किंमत सातशें रुपये लावली. सातशें रुपये देणें—चागल्या परिस्थितींतसुद्धा किसनला जड होते.

दोन्हीं बाजूंनीं घासाघीस होता होता रक्कम उतरून पाचशेंवर आली. लग्नाचा खर्च किसननें आपल्या शिलकींतून केला. पण पाचशें रुपयाची भर करण्यासाठीं त्याला आपली जमीन गहाण टाकावी लागली.

त्याला त्याची फिकीर नव्हती. कर्ज काढण्याची रीतच असल्या-मुळें त्याचा धोंडा त्याला उरावर जाणवत नव्हता.

इतक्या त्रासानें मिळवलेली निरू खरोखर सुदर फूल होतें तें. ह्याच फुलातून आगीच्या ठिणग्या भडकतील—आणि अनेक लोकाच्या जीविताचे ओघ त्यामुळें बदलतील; असें भविष्य कुणाला करता आलें असतें? माझ्या आयुष्यात तिनें अप्रत्यक्ष-पणें केलेली क्राती मला तेव्हां कशी दिसणे शक्य होते?

---

*

# प्रवाह

## १३

'पत्रे कमती पडतात जणूं' गणपत मास्तर काहीसा आपल्याशींच म्हणाला. त्याच्याच्या भोंवताली १०–१५ बायकापोरी आपापले 'पालव घेऊन पानें–तबाखू वगैरेसाठीं उभ्या होत्या. त्यात निराही होती.

संसाराला लागताच निराला किसनबद्दल एक विलक्षण आपुलकी निर्माण झाली असावी. आपल्या बापाने पाचशे रुपये घेऊन आपल्या संसाराचे वाटोळे केलें, अशी एक कटु भावना तिच्या मनात निर्माण झाली. हे ऋण शक्य तितक्या लवकर उतरून मोकळे होण्याची तिची धडपड सुरू झाली. सहजच आपण कारखान्यात काम केल्यास तेथे मिळणारे ७–८ रुपये महिने बचतींत पडेल असे तिच्या मनाने घेतलें. किसन तिला कारखान्यात पाठवायला अत्यत नाखुष होता. आपल्या बायकोने दुसऱ्याच्या हाताखाली मोलमजूरी करावी हे त्याला पटेना.

तथापि वर्षाला ८०–९० रु. म्हणजे केवढी मोठी रक्कम होती त्याच्या गरीबीला. तिच्या सासूनेही "आपण काम निभवूं शेतीचं." असा अप्रत्यक्ष रुकार दिला. आणि १॥–२ महिन्याच्या प्रेमकलहानंतर निरा कामावर जाऊं लागली.

तिला ते वातावरण नवें वाटलें–इतकेच नव्हे तर तिथें तिचा जीव घाबरूं लागला. लहानशा चौकाच्या चारी बाजूंनीं अरुंद कौलेरी पडव्या उतरलेल्या होत्या. चौकापेक्षा पडव्या जेमतेम चार बोटें उंच—त्यामुळे पावसाळयात चौकाकडचा भाग ओलाचिंब असे. पाऊस पडूं लागला म्हणजे अंगावर तुषार येत ते निराळेच. ह्या पडव्यातून ५०–६० बायका दोन रागानीं आपल्या–आपल्या फडक्यातून विडया करण्याची सामग्री घेऊन बसत.

सकाळपासून संध्याकाळपर्यंत मरून काम केल्यावर आपला माल मोजून द्यायचा. त्यात 'छाट' किती निघेल ह्याचा अंदाज कधीं येणे शक्यच नसे. कारण 'छाट'—बिघडलेल्या विडया—गणपत मास्तराच्या मर्जीनुसार कमीजास्त निघायची.

आणि त्यानंतर आपलीं शिणलेलीं शरीरें घरीं कुतरओढ करीत आणायचीं.

लेकुरवाळ्या आयांचीं पोरें तिथेंच खेळत. आणि आया मुले मिळून ८०–९० माणसाचा समुदाय दिवसातून ८-९ तास कोंडवाड्याप्रमाणें एकत्र ठेवला म्हणजे कोंडवाड्यात जी घाण पैदा होते, ती येथे दिवसाच्या अखेर होई. खेड्यातून आलेल्या निरेला हे सगळें असह्य होई. पण . नवऱ्याला सांगितले तर काम बंद करायचा...

तिच्या पोटात ह्या गोष्टी मावेनाशा झाल्या म्हणजे ती आमच्याकडे येई. आणि मला आणि आईला आपलीं दु:खे सांगे.

......गणपत मास्तरचे लक्ष आपल्याकडे जरा जास्त आहे, असा तिला अलीकडे संशय येत होता. तिच्या मनाला एकदम धसकाच वाटला.

" तूं घाबरतेस काय ? करणार आहे तो तुझ ? तूं दहा बायकाबरोबर जातेस दहाबरोबर परत येतेस. आपण नी आपल काम चोख असल—झालं. "

तिला माझं म्हणणं पटलं. पण मनाच्या शंकाकुशंका कमी होईनात. कारण तिच्या बरोबरीच्या बायकात गणपत मास्तरावरून बरीच टवाळी होई. महादबाच्या सुनेची छाट थोडी निघते. जिवाच्या बायकोच्या विड्या सगळ्याच्या अखेर पटतात. तीही मागें रेंगाळते. गणपत मास्तरचा रेशमी रूमाल सरूच्या पोराच्या हातीं आला.

" तुझं मन स्वच्छ आहे ना ! तुला कशाला चिंता ? "

" कर नाहीं तर डर ग कशाला ? " आई म्हणायची.

...पानें खरोखरच कमीं पडलीं. 'चाल तर निरुबाई. कोठींतून पत्रें आणशील ' सहजतेनें मास्तर म्हणाला. पण समोर उभी असलेल्या सारजेनें डोळे मिचकावले ते निरेच्या नजरेंतून सुटले नाहींत. निरा आपल्या जागची हलली नाहीं.

शेवटची गड्डी, एकीच्या हातीं देत तो पुन्हा म्हणाला,

" चाल, चाल उशीर व्हा लागला " पानाचे टोपले मागच्या जोत्यावर ठेवले होते. पडव्यामध्यें जाण्याच्या रस्त्याला, एका अगाला रुद व उंच जोते होते. ह्या जोत्यावर मास्तरची बैठक व भितींत सेफ होती. सेफच्या बाजूला दार होते. ह्या दारातून आत गेले म्हणजे कोठार लागे. खोली साधारण अंधारीच होती. खोली-तून एक जिना गेलेला होता. खोली आणि बैठक ह्या मिळून वरती माडी काढलेली होती. तेथेंही पाने भरलेली असत.

निरेला स्वस्थच उभी पाहून एक प्रौढा म्हणाली.

" जा न वो. येल व्हाय लागला. "

" मी नाहीं जात. पत्ते आणायचं काम माझं होय का ? "

" काउण, काउण व " मास्तर मध्येंच म्हणाला ' राजाची राणी होती. आली कशाला कारखान्यात विड्या वळायला ? '

. .निरा पाने आणायला अखेर गेली नाहीं. तिने आपला हट्ट पुरा केला. पण त्याच्यासाठीं मास्तरचीं दहा ऐकावीं लागलीं. तिच्या मनाला खत वाटली. आता काम सोडून घरीं जावें असेंही मनात आलें. पण दूरवर पाहून तिने आपले मन सावरले. खालच्या मानेनेच सगळे सामान घेऊन ती आपल्या जागेवर जाऊन बसली.

सध्याकाळीं निरा आली, ती अगदीं हिरमुसून. मलाही तिची समस्या सोडवता येईना. कारण तिला पानें आणायला सागण्यात मास्तरची चूक काय ? त्यानें निरेचें नाव हेतुपूर्वक घेतलें; हे समजायला माझ्याजवळ साधन—निरेची स्वताची भावना. आणि दुसऱ्याना सिद्ध करून दाखवण्याची शक्यता किती ? शून्य !

' जरा मालकाकडे तक्रार करून बघ ' आई म्हणाली,

' काय तक्रार करणार आई. मास्तर का आपला हेतू कबूल करील ? त्यापेक्षा कुठें वाच्यता न केलेली बरी नाहीं ? '

नेहमींप्रमाणें मी निरेला धीर दिला ती घरीं गेली.

मास्तर निरेच्या राशीला लागला होता. तो रोज तिला काहींना काहीं काम सांगे. रोजच्या कटाकटी होऊं लागल्या. अखेर एक दिवस मीच कारखान्यांत गेलें.

मास्तर म्हणजे एक तिशीचा व्यसनांनीं पोखरलेला, वर मान न करणारा माणुस दिसला मला. मी त्याला निरेबद्दल विचारलें.

" बाई, इथला रिवाजच आहे कीं रोज कोणीनाकोणी रोज-दारीण सामान काढते. ते दिवशीं पत्ते कमी पडले. मी सहज म्हणालों ' निराबाई टोपली उचल ' तर साफ ' नाहीं ' म्हणून गेली. काम असं चालतं का बाई ? मी जर असंच प्रत्येकीचं ऐकत गेलों तर माझं कोण ऐकेल चार दिवसानीं. "

त्यानें आपली बाजू इतकी अजीजीनें नम्रतेनें माडली. मला त्याचें म्हणणें पटलें. सहकार्यावाचून कामें व्हायचीं कशीं. नी तींही कारखान्यांचीं ? त्याच्या दृष्टींतही काहीं गौण मला दिसलें नाहीं.

...दिवाळीपूर्वीची गोष्ट असेल, मी आईबरोबर चाळीस मैला-वरच्या ' तपोवनात ' स्नानाला गेलें होतें. स्थान अत्यंत रमणीय असल्यानें माझे मन तेथेच रमले आणि मी व आई दोन दिवसा-ऐवजीं चार दिवस तेथे राहिलों.

मी परत आलें तों आग लागलेली होती. स्त्रियानीं कामावर जाण्याचें नाकारलें होते आणि मालकानीं दिवाळीच्या निमित्तानें ४ दिवसाची सुटी जाहीर केली होती.

मी येताच निरा पुन्हा माझ्याकडे आली. मला पाहून तिला रडण्याचा उमाळा आला. बराच वेळ भावना वाहूं दिल्यावर मी विचारलें.

" निराबाई काय झालं, कस झालं नीट साग बरं मला. "

निरेच्या लाब पण अपुऱ्या कहाणींतून मला जे निष्पन्न झालें तें असें.

मास्तरशीं भाडता-भाडता निरा थकली, सोबतिणींनींही 'पाण्यात राहून माशाशीं वैर करून भागत नाहीं म्हणून सागितले. तिचें तिलाही वाटूं लागलें ' करतो काय मास्तर ? '

अखेर ती कोठारात एक दिवस गेली. दुसरे दिवसापासून मास्तरनें तिची पाठ सोडली. क्वचित तिची पाळी येई—नाहीं

असें नाहीं. तशी पाळी सर्वांवरच येई. मधून-मधून निरेचा जीव स्थिरावला. तिला वाटले ' उगीच आपण मास्तरला इतके भ्यालों; आपल्याला त्रास करून घेतला; इतराना घाबरून टाकले. '

मी तपोवनाला गेले त्या दिवशींची गोष्ट. पाने कमी पडलीं नी आणायची पाळी निरेवर आली. कारण ती थोडी उशीरा कारखान्यात आली.

निरा टोपली उचलून मास्तर मागें गेली. खालचीं पानें संपल्याचें सागून तो तिला माडीवर घेऊन गेला.

निरा खाली वाकून टोपली भरीत होती. तिच्या उघड्या पाठीवर तिला हात फिरताना जाणवला. ती चवताळून मागे वळली. मास्तर हंसत होता.

" घाबरली काय ? " त्याने विकृतपणे विचारलें.

निरेच्या तोंडातून प्रथम शब्द निघेना. ती रागाने थरथर कापत होती. तिच्या मौनाचा अन्वयअर्थ करून मास्तरने तिचा दंड धरला. निरेची किंकर्तव्यमूढता विलयाला गेली. ती कडकडून त्याच्या हाताला चावली. मास्तर जोराने ओरडला. त्याच्या हाताची पकड सैल पडली.

मोकळ्या हवापाण्यावर साधारण सुस्थितींत वाढलेली निर्व्यसनी निरा, मास्तरला आवरणे सहज नव्हते. तिने ताडताड चार पाच त्याच्या तोंडात मारल्या आणि टोपली तिथेंच टाकून ती खाली आली.

तिचे सतापानें लाल झालेलें तोंड, मास्तरचा बेपत्ता—सगळी परिस्ती संशयास्पद होतीच. बायकानीं तिला पहाता—पहाता घेरली. परतु कुणाला धड उत्तर देण्याच्या मनःस्थितींत ती नव्हती. अक्षरही न बोलता तिने आश्रमाची वाट धरली.

आश्रमात माझी भेट न झाल्याने काय करावें हा थोडा विचारच पडला तिला. किसनला सारा इतिहास सागण्याची तिची हिंमत नव्हती. बराच वेळ विचार करून अखेर सासूला सर्व हकीकत सागण्याचे तिनें ठरवले; आणि आश्रमातून ती घरीं गेली.

सुदैवानें शेतात काहीं काम जास्त असल्याने किसन घरीं यायचा नव्हता. त्याला शेतातच भाकरी पोंचवायची होती.

म्हातारीने निरेचे म्हणणे शातपणाने ऐकून घेतले. तिलाही पेंच पडला असावा. अखेर ती म्हणाली.

जिवबा बाबाला आपण सार जाऊन सागू या. महार मंडळी वृद्ध आहे. किस्नाला काय सागायचं ते तोच सागेल. नी पुढें काय करायच तेही त्यालाच समजेल."

दोघीजणी उठून जिवबा बाबाच्या घरीं गेल्या.

बाबाने सारी हकीकत ऐकून घेतली.

"ह फार माजलाय तो मास्तर. ठिकाणावर आणायलाच पाहिजे. अन अस करा. किसनाला इथं पाठवून द्या. त्याला सगळं सागायलाच पाहिजे."

"पोरगा डोक्यात राख घालून पोरीला मारहाण—"

"नाहीं नाही किसना मोठा समजुतदार पोरगा आहे. घाबरूं नका. घरीं जाऊन लावून द्या त्याला."

## 'काट्याचा नायटा' १४

सारी कथा ऐकून माझ्यापुढें एकच प्रश्न उभा राहिला. निरूच्या अंगावर मास्तरानीं हात टाकला. पण तेवढ्यासाठीं साऱ्या बायका संपावर जायचं काय कारण? पोटाला भाकरी कोणाला नको होती? मी दादाची चौकशी केली, तो घरीं नव्हता.

...काय करावं असाच विचार करीत होते. निदान हरिजन वस्तींत जाऊन पहावे, ह्या विचारानें बाहेर आले. तों समोरून डॉक्टरबाबू येताना दिसले.

त्यांचा माझा तसा काहीं परिचय नव्हता. चर्चा प्रसंगीं जगावेगळीं मतं त्यांच्याकडून कधीं ऐकायचा प्रसंग येई तेवढाच. मला पहाताच ते म्हणाले,

" उज्वलाताई, तुमच्या डिपार्टमेंटमधे काय चाललंय् ? तुमच्या ४ दिवसाच्या गैरहजेरींत इथें तर प्रचंड क्राती झाली.

" त्याचाच शोध घ्यायला निघालें होतें."

" निरूची हकीकत कळलीच असेल ? "

" आल्याबरोबर. कळलं नाहीं एकच. निरूच्या पावित्र्य रक्षणासाठीं सारा महारवाडा तुटून पडण्याइतकी तत्त्वनिष्ठा त्याच्यात कधींपासून आली ? "

" त्याचं अस आहे उज्वलाबाई." डॉक्टर जरा थाबले. नंतर म्हणाले, " माझी कार्यकारणपरपरा तुम्हाला पटेलच असें मला वाटत नाही. गेले दोन तीन दिवस मी ही चौकशी करतों आहें. ह्या असंतोषाचीं मुळं पुष्कळ खोल आहेत. आणि हें प्रकरण बरच चिघळणार असा माझा स्वताचा अंदाज आहे."

" तुमचा अंदाज काहीं वस्तुस्थितीवर आधारलेला असेल कीं नाहीं."

" हा दृष्टिकोणाचा फरक आहे. मला जी वस्तुस्थिती भासते ते तुम्हाला स्वप्न वाटेल. पण ही तात्त्विक चर्चा कशाला ? तुम्ही महारवाड्याकडे जाता आहा ना ? मी वाटेत सागतों सगळं."

" बायाची मुख्य तक्रार अशी दिसते कीं आजकाल त्याच्याकडून काम जास्त घेतल जात."

" piece-work असतं ना पण हें ? "

" असतं ना ! पण रोज वळलेल्या विड्याची किमान संख्या पुरी करावी असा हट्टाहास मालकानीं धरला आहे. गेल्या आठ दहा दिवसात."

" आठदहा दिवसात ? " मी प्रश्न केला. अशी काय क्राती झाली ह्या पंधरवड्यात ? "

" म्हणतात कीं विडयाचीं मुख्य केंद्र मध्यप्रातात आहेत. तिथ चालले आहेत संप. त्यामुळं इथल्या मालाला एकदम भाव जास्त यायला लागलाय. "

" अस्सं. पण बायकाचं काय नुकसान आहे त्यांत ? त्याना अधेला-पैसा अधिकच मिळेल कीं नाहीं. "

" अधेला–पैसा जास्त मिळाला तरी त्या मानानं श्रम फार पडतात. कारण घरीं यायची त्याना संध्याकाळीं घाई होते शिवाय बायका थकलेल्या असतात. त्यामुळें छाट फार निघते. तिच्यावर मजुरी मिळत नाहीं. घरीं येऊन कामधंदा करायची ही अवकत रहात नाहीं. अधेला–पैसा नाहीं. दुप्पट मजुरी दिली म्हणून माणूस दिवसातून सव्वीस तास काम करूं शकेल काय ? "

तर्कदृष्ट्या मला डॉक्टरच म्हणण योग्य वाटल पण .

" मला तर काहीं माहितीच नाहीं काम वाढल्याची. "

" कुठून असेल ? कामकरी बायका रात्रीं आठ–आठ वाजता परत येत होत्या. निरू आज पंधरा दिवस आश्रमात आली नव्हती."

माझ्या तें लक्षात आले होते व मी आईला तसें म्हटलेंही होते.

" पण मास्तराच्या वागणुकीचा नी ह्या कारणाचा ताळमेळ नाही बसत डॉक्टर. " डॉक्टर फक्त हंसले.

" जगात सर्वच गोष्टी कार्यकारण भावानें होतील तर ! "

" विनय काय म्हणतो आहे ? "

" त्याना माझ म्हणणं पटल नाहीं. "

" त्याना संपाच्या बुडीं काय दिसतय ? "

" ते म्हणतात महार हीन जात झाली, अधोगतीला पोंचली म्हणून काय झाल. बायकाच्या अब्रूची चाड त्याना नाहीं कीं काय ? बायकाना हात लावल्यानें मोठालीं राज्य रसातळाला गेलीं आहेत बाबा. स्त्रीची विटंबना कुठलाही पुरुष सहन करू शकत नाहीं. "

" खरं आहे त्याच म्हणण ! "

" निदान तर्क शुद्ध तरी वाटतं. " डॉक्टरनी दुजोरा दिला.

" मग तुमचंच मन कस इतकं वेगळं झाल बुवा ? "

" माझ डोकं जरा विचित्र आहेच. आणखी अस झालं कीं मी गेले चारपाच दिवस रोज त्याच्या चर्चाना हजर असतों. त्यात स्त्रियाच्या अब्रूचा—शीलाचा प्रश्न चर्चिला जातो हे खरे. परंतु गणपत मास्तरला काढावें ह्या मागणीच्या भरीला पाच वाजता कारखाने बंद करावे ही मागणी तितक्याच जोरानें पुढे येते

आहे. आणि खरं सागायचं तर बायाच्या शरीराचा व्यापार-व्यवहार प्रत्येक कारखान्यातून थोड्याबहूत प्रमाणावर चाललेला असतो. मग आताच काय येवढं पावित्र्यरक्षण करायचं सुचलंय ह्या लोकाना ? ”

कार्तिकाचा महिना, उन्हं केव्हाच कोंवळीं झालीं होतीं. दिवस पहाता पहातां अस्तंगत झाला. थड वारे हळूहळू वाहूं लागले. आम्ही वस्तीत आलों तों गारठा वाटूं लागला होता. मी पदरानें अंग लपेटून घेतलें. डॉक्टरबाबूंना काय वाटत होतें कोण जाणें; मध्येंच म्हणाले,

‘ ताई ’

“ काय ”

“ काही नाही. ” त्यानीं गोंधळून उत्तर दिले.

वस्तीत यायला हीच वेळ होती. काम करून थकलेले पुरुष जागोजाग बोलत बसले होते. चर्चेचा विषय सप हाच होता.

चारपाच अड्ड्यावर थोडा थोडा वेळ घालवल्यावर मलाही डॉक्टरच्या म्हणण्यात तथ्याश वाटूं लागला. स्त्रियाच्या शीलाचा प्रश्न चर्चेतून मागें पडलेला दिसला. इतकेच काय पण स्त्रियाना स्वताला त्या प्रश्नाची फारशी पर्वा दिसली नाही. उलट कारखान्याच्या सर्वसाधारण व्यवस्थेवर कडक टीका ऐकूं येत होती आणि स्त्रियानी अपरात्रीपर्यंत काम करण्याच्या विरुद्ध प्रत्येकजण दिसत होता.

...आम्ही परत फिरलों. थंडी कडकली होती. डॉक्टरबाबू पुनश्च एकदा निश्चयानें म्हणाले.

“ ताई, रागावू नका. पण माझ्या अंगावरची खादीची चादर स्वच्छ धोब्याची आहे. ती लपेटून घ्याल तर बरं होईल. ”

“ आणि तुम्ही ? ”

“ मी काटक आहें तुमच्यापेक्षा—शिवाय ” मी मध्येच थट्टेनें म्हणालें ‘ स्त्रीजातीचा अपमान आहे डॉ. बाबू हा. ”

त्याना माझी थट्टाही नीट समजली नाहीं. ते आर्जवानें म्हणाले,

समजा तुम्ही जास्त कडक आहांत पण त्याचं असं आहे ताई. मी मेलों तर दहात एक. आणि तुमचं बरंवाईट झालं तर एकात एक—म्हणजे समूळ नाश."

" मनाला बर नाहीं वाटत, डॉक्टरबाबू आपल्या सहकाऱ्याला उघडं करून आपण आपलं रक्षण करण."

डॉक्टरनीं उत्तरादाखल चादर मला दिली. अनुराधा-विशाखा डोक्यावर नाचत होत्या. डॉक्टरच्या शालीनें माझ्या शरीराला किती ऊब दिली कोण जाणे, पण माझ्या भावनाना चालना मात्र दिली....

मला एकाकी अतिशय उदास वाटत होते. डॉक्टरचे अस्तित्व जणू मी विसरून गेले. माझा जीव कळवळून काहीतरी मागत होता—काय काय बरे ? अनेक भावनाच्या गुंतागुंतींतून एक निव्वळ भावना वर आली. माझे हृदय विनयच्या हृदयाची उब मागत होतें. आणि—आणि तो विनय कुठे होता...ही कल्पना सुस्पष्ट होताच माझी मला ती अपमानकारक वाटली. मी बलाने तिला दाबून टाकण्याचा प्रयत्न केला.

वाटेत आमचे फारसे बोलणें झालें नाहीं. आश्रमात येताच डॉक्टरबाबू ' नमस्कार ' म्हणून आपल्या झोपडीकडे वळले. मी आपल्या उदास तंद्रेत आपल्या कुटीकडे.

विनयच्या कुटींत प्रकाश होता. आणि तो दारात उभा होता, हें त्याच्या नितळ रेखाकृतीवरून ओळखले. माझ्या मनाला अधिकच उदास वाटलें—हाताशीं असावें पण हाताला लागूं नये !

" कोण उज्वल ? किती उशीर केलास परत यायला ? "

मी आवंढा गिळला. आपली उदासीनता विसरून कृत्रिम हास्य मुखावर आणीत म्हटलें. ' निघालें जरा उशीराच.'

' एकटी इतक्या काळोखात कसली परत येतेस ? त्यात रस्ताही अंधेराच. दिवे नाहींत खाचाखळगे भरपूर.'

मी हंसून म्हणालें. ' डॉक्टरबाबू होते ना बरोबर. ' आम्ही आत येऊन त्याच्या समईपाशीं बसलों.

'अस्सं,' त्याचा शब्द मला लागला खरा. पण उदास मनाला काय लागत नाहीं ?

मी त्या 'अस्से' कडे दुर्लक्ष करीत म्हणालें 'चार दिवसात पुष्कळच उलथापालथ झाली आहे.'

तशी फार नाहीं. मी गेलों होतों त्या शेठजीकडे. प्रथम म्हणाला चौकशी करतों. मग म्हणाला मास्तर वाइट मनुष्य नाहीं, ती बाईच आहे तसली.

आता उद्या कारखाना उघडायचा, तर आज पुन्हा गेलों होतों. तो म्हणतो "मास्तरला बदलणं सोप आहे नी मी बदली-नही. पण बायाच्या धमकीने नाही. त्याना कामावर रुजू होऊं द्या. चार दिवसानीं मी त्याला दुसऱ्या केंद्रावर पाठवतों. काम-करी नी मास्तर ह्याचे सबंध बिघडले म्हणजे आमचंही नुकसान होतच कीं नाहीं ?"

मी त्याला म्हणालो "बदली करायला तू तयार आहेस मग बायकाना हरवण्याचा अट्टाहास का ?"

"काळ सोकावतो म्हणून."

मी म्हणालों, मी तुझं म्हणणं बायकाना सागतों. त्याना तें नच पटलं तर सत्याग्रहाचा मार्ग त्याना मोकळा आहे. किती केलं तरी त्याच्या अब्रूचा प्रश्न आहे.

तो हंसला नी म्हणाला "जशी तुमची मर्जी. कारखाना मात्र आम्ही बंद ठेऊ शकत नाहीं. ह्या बाया कामावर न आल्या तर हप्त्याभरात आम्हाला नवी भरती करावी लागेल."

दुसऱ्या दिवशीं सकाळीं कारखाना उघडला. बायका कारखा-न्याच्या फाटकाशीं गोळा झाल्या. आत जावें कीं नाहीं हा विचार होता. मी नी दादा तिथें पोंचलों. मालकाचें म्हणणे त्याना समजावलें.

काहीं दहापाचना तें पटलें. 'मालक आहेत ते. आज ना उद्यां मास्तर गेल्याशीं आपलं काम."

बाकीच्या म्हणाल्या "आणि दिवे लागण पावतर आम्हांला

इथं बसवतात त्याचं काय ? आम्हाला घरं नाहीत का पोरबाळं नाहींत. ”

“ अन् काळोखातनं बायाबापड्यांनीं कसं जावं. इथं तर दिवसाढवळ्या अंधेर होतो. कारखाना दिवसाउजेडीं बंद झाला पाहिजे. ह्याच बायकाची सख्या मोठी होती. मला त्याच्या मागणीचें नवल वाटले नाही. डॉक्टरबाबूची विचारसरणी चुकली असली तरी वस्तुस्थिती त्याना अवगत होती, असे मला वाटले.

उलट दादा जरा त्रासून म्हणाला “ तुम्हाला काय पाहिजे ते नीट ठरवा पाहूं. काल तुम्हाला गणपत मास्तर नको होता. आज कारखाना लवकर बंद करा म्हणता. उद्या आणखी काहीं म्हणाल.”

तो थाबताच बजबजपुरी माजली. तो गोंधळ थाबून निश्चय व्हायला दीड तास मोडला. “ अपरात्रीपर्यंत काम न करण्याचाच विचार ” स्त्रियानी पक्का ठरवला.

ह्या सगळ्या गोंधळात पधरा–वीस बायका कामाला लागल्या होत्या. तेव्हा आज बाकी सर्वांनी घरोघर जावे व उद्या सत्याग्रहाला फाटकावर सुरवात करावी असे ठरले, आणि सगळ्या तेथून पांगलों.

...सत्याग्रह सुरू झाला. परतु तो सत्याग्रह कामकरी स्त्रियाचा होता. आम्हाला असलेला अनुभव मध्यमवर्गीय स्वयंसेवकाच्या पिकेटिंगचा होता; आणि पोलिस, जनता सर्वांची सहानुभूति सत्याग्रह्याना होती.

आता—मालक विरुद्ध, जनता बेपर्वा पोलिस पैशाचे मिंधे; अशा परिस्थितींत सत्याग्रहाचे वातावरण भराभर पालटूं लागलें.

पहिले दिवशीं सत्याग्रह ठीक झाला. चार–पाच स्त्रियापलिकडे कोणी आत जाऊं शकलें नाहीं. दुसरे दिवशीं सत्याग्रही येण्याच्या आतच—सकाळीं सहापासून मालकानीं जुने नवे मिळून तीस मजूर आत बसवले. काय करावें हे न समजल्यानें आम्ही परत आलों. मात्र कारखान्यावर दिवसभर बायका नी रात्रभर पुरुष अशा पाळ्या वांटून दिल्या.

तिसऱ्या दिवशीं सकाळीं, सत्याग्रह्याची नवीन स्त्रियांशीं बाचा-बाची आणि शिविगाळ झाली; आणि...

. शरमेची गोष्ट म्हणजे परस्परात मारामारी होऊन सत्या-ग्रहाचे रूपानर दुराग्रहात झालें.

---

## सत्याग्रह १५

सत्याग्रह तीन दिवसातच हातापायावर येऊन पोंचला. सर्व मंडळी मोठ्या फिकिरींत पडली. अहिंसा हें आमच्या जीवनाचें मूलभूत मूल्य. आमच्या सग्रामाचा तो पाया. आणि तो पाया सुरवातीला ढासळूं लागल्यावर आम्हाला गागरल्यासारखें झाले. काय करावे ह्याचा उमज पडेना.

सत्याग्रह बंद ठेवण्याचा सल्ला दादानें दिला. परंतु हा सल्ला ऐकायला बायका तयार नव्हत्या. धक्काबुकी करणें योग्य नाही असें त्याना आम्ही सागितले, पण तेही त्याना नीटसें समजेना. त्या म्हणत ' आमच्या पोटावर पाय आणतात ह्या नव्या मजूर-रदारणी ' नी त्याच्या त्या शिव्या—ते अपशब्द ऐकून घेताना मनाला ज्या यातना होत !

आणि—डॉक्टरबाबूंना काय गोडी वाटली ह्या प्रकरणात कोण जाणें. ते बराचसा भाग घेत होते—ते म्हणूं लागले " आपला सत्याग्रह असा यशस्वी कसा होणार ? माझी बातमी तर अशी आहे कीं जरूर तर हें केंद्र बंद करण्याचा मालकाचा विचार आहे. "

" त्याना काम बंद कसें ठेवता येईल. त्याच्या मालाला भाव आहे; तोंवर २ पैसे कमावणार. पैदास बंद करून माल यायचा कुठून ? "

" ते काय ह्या साठ-सत्तर बायकावरच अवलंबून आहेत ? त्याचीं आणखी पाचसहा केंद्रं आहेत साऱ्या तालुक्यात. इथेंच आणखी एक आहे. त्यांत मजुरांची संख्या वाढवतात आहेत. "

" आणि सत्याग्रह लांबेल तितकं बायकांचेंही नुकसान आहे. ह्या हातावर मिळवून त्या हातावर खावयाचें ! "

ह्या सगळ्या चर्चेतून काहीं निष्पन्न झालें नाहीं. ह्या प्रकरणातून अंग काढून घेणे हाच एक मार्ग आम्हाला स्पष्ट दिसत होता. पण तसे करणे म्हणजे धारेला होडी नेऊन सुकाणू सोडून देण्यासारखे व म्हणून विश्वासघाताचे वाटूं लागले. आम्हीं सत्याग्रहाची कल्पना मान्य करून तिला मूर्त स्वरूप दिले नसते तर चार-दोन दिवस बायका गडबड करून स्वस्थ बसल्या असत्या.

अखेर आम्ही विनयला असा सल्ला दिला की सत्याग्रहातून अंग काढून घेण तर योग्य नाहीं. पण त्याने मात्र त्यात विशेष पुढाकार घेऊं नये. कारण तो आश्रमाचा प्रमुख चालक होता. आणि काहीं घोटाळा झाल्यास साऱ्या आश्रमाचे नाव बद्द् होण्याचा संभव होता.

दुसऱ्या दिवशीं आम्ही कारखान्यात गेलों. फाटकावर पोलीसचा पहारा होता. पोलीस पधरा होते आणि एक सब इन्स्पेक्टर होता. त्याची ती भिंत पहाताच मला रोजच्यापेक्षा वातावरण गंभीर वाटलें. मी येताच इन्स्पेक्टरसाहेब पुढें आले आणि कारखान्याचे आवार सोडून बाहेर जाण्याची विनंति केली.

" हे पहा, ह्या स्त्रिया ह्या कारखान्याच्या मजूरदारणी आहेत. त्याना इथे येण्याचा हक्कच आहे. आपली तशी इच्छा असेल तर आपण मला पकडूं शकता. "

" बाई, काल इथे सत्याग्रह शांततेने पार पडला नाहीं; हें तुम्हाला माहीत आहे ना ? तुम्ही स्वताला अहिंसावादी म्हणवता. तुमचा पाठिंबा ह्या स्त्रियाना असावा ह्याचे मला दुःख वाटते."

" तुमच्यापेक्षाही कालच्या घटनेने मला जास्त खेद वाटला. परंतु अहिंसा मनुष्य एका दिवसात शिकत नाहीं. त्याच्यापुढें आज उपाशीं रहाण्याचा प्रश्न आहे. तात्विक प्रश्न त्यांना चटकन उमजत नाहींत, तथापि भविष्यांत असा प्रसंग येणार नाहीं असा प्रयत्न मी करतें आहे. "

‘ आपण हे आवार सोडायला तयार नाहीं तर ? ’ त्यानें जरा निकरावर येऊन विचारलें.

‘ सत्याग्रही माघार घेत नसतो. ’

डॉक्टरबाबू माझ्या बाजूला उभे होते. इन्स्पेक्टरने थोडा विचार केला व नंतर म्हणाला,

“ मिस्टर, आपण तरी बाहेर जा ” ते हंसले, व त्यांनीं माझ्याकडे पाहिले.

‘ मला वाटते तुम्ही बाहेर जा. मला पकडले तर पुढें पहाता येईल !

स्त्रिया रस्त्यावर पोलिसच्या पुढें बसल्या होत्या. इन्स्पेक्टर आत निघून गेला.

मला पकडण्यात आले नाहीं.

दुसऱ्या दिवशीं ते केंद्र खरोखर बंद करण्यात आले.

डॉक्टरबाबूंची कल्पना खरी ठरली. दुसऱ्या केंद्रात काम अधिक जोरानें सुरू झाले. आता एकच उपाय राहिला—दुसऱ्याही केंद्रात सत्याग्रह करणें. परंतुः

त्या केंद्रात सत्याग्रह करण्याचा आम्हाला अधिकार होता काय ? गणपत मास्तरवरून इथें कलह सुरू झाला. आणि मूळ प्रश्न बाजूलाच. हा भलता उद्भवला.

‘ ह्या मजूराना सत्याग्रहाचीं मूलतत्त्वें समजत नाहींत. आवश्यक त्याग करण्याची त्यांची तयारी नाहीं. नव्हे त्यागाची किंमत त्याना समजत नाहीं. ज्याना आत्म्याची तोंडओळख नाहीं त्याना त्याच्या बलाची कल्पना द्यायची तरी कशी ?

पुनश्च एकदा सत्याग्रह तहकूब करण्याचा प्रयत्न आम्हीं सुरू केला, परंतु लोक अजून जोरात होते. त्यांची इच्छा सगळ्या विडीच्या धंद्यात काम बंद करण्याची होती. त्यामुळें आमचें म्हणणें कोणी ऐकेना.

अखेरीस मी त्रासले; आणखी सत्याग्रहाचें कार्य सोडून जाण्याचा धाक घातला; तेव्हा लोक गडबडले; आणि थोडे खालीं उतरले.

अखेर तडजोड झाली ती अशी कीं एका मालकाच्या दोन्ही केंद्रात सत्याग्रह सुरू व्हावा. आणि त्याप्रमाणें मी कारखान्याचे मालक 'लक्ष्मीचंद मोतीचंद' ह्याना पत्र लिहून तीन दिवसात दुसरा सत्याग्रह सुरू करणार असल्याचें कळवले.

तेच दिवशीं "लक्ष्मीचंद मोतीचंद"चें मला भेटीला बोलावणारें पत्र आले.

...मालकाचें म्हणणे ठीकच होते एक तऱ्हेने. गणपत मास्तरची बदली करायला त्याची काहीं हरकत नव्हती. परतु कारखाना वेळेच्या आधीं—सव्वा आठला सुरू होऊन संध्याकाळीं सात साडेसातपर्यंत उघडा राही. आणि त्यात बदल करण्याची शक्ति त्याना तरी नव्हती, कारण बाकीच्या कारखान्याच्या वेळा ह्याच होत्या. बाकीच्या कारखान्यातून ही वेळ चालू असताना एकाच फर्मला आम्हीं वेळ बदलण्याचा आग्रह करावा हा जुलूम नव्हता काय?"

पुनश्च काय करावे हा प्रश्न उद्भवला. बाकीच्या कारखान्यातले मजूर—स्त्रीपुरुष दोन्हीं जास्तीच्या कामाला अधिकाधिक त्रासत होते. दिवस हळुहळू लहान होत होता. दिव्याच्या उजेडाने काम करणे, म्हणजे अतिशय त्रासाचे, जिकीरीचे होऊ लागले.

त्यामुळें लोकाचा उत्साह प्रतीकाराला वाटेल तेव्हढा होता. ही प्रचंड जबाबदारी अंगावर घेताना आमचा आम्हाला विश्वास वाटेना. कारण ह्या प्रमाणावर सत्याग्रह करण्याचा अनुभव आम्हाला कुठे होता? नी तशी आमची तयारी तरी कुठे होती.

पण—आमचे मत ह्या लोंढ्यात तेव्हाच वाहून गेले. लोकानीं सत्याग्रह करण्याचा विचार निश्चित केला. आणि त्याच्या सागण्याप्रमाणे मालकाना खबर दिली गेली.

मालक रॉकेल तेलाच्या चिमण्याऐवजीं गॅसचे दिवे द्यायला तयार झाले. छाट निघेल तिच्याबद्दलही अर्धी मजूरी देतों म्हणूं लागले. पण लोकाना दहा तास काम करणे मान्य नव्हते.

तुम्हीं दोन shilt नी काम करवून घ्याल तर काय हरकत आहे?

बाई तें जमणें शक्य असेल तर आमची हरकत नाहीं. पण तें

कसं शक्य आहे. हें जास्तीचं काम महिना पंध्रा दिवस चालेल. तेवढ्यासाठीं जास्तीचे मजूर आणावे कुठून? आणि दिवसाचे सात तास काम ह्या मजुरानी केल्यावर उरलेल्या अडीच तीन तासासाठीं कोण येणार? आमच्यापाशीं जागेची व्यवस्था नाहीं. देखरेख करणारीं माणसं नाहींत."

तडजोड होण्याचीं लक्षणें दिसेनात. कारण लोकामध्यें जोम होता; आणि यश मिळवण्याची आशा होती.

सत्याग्रह सुरू करून चळवळ चालवायची म्हणजे शिबिर उघडणे आम्हाला आवश्यक वाटले. हरिजन वस्तीतील एक धर्मशाळा पसत करून आम्ही शिबिराची प्राणप्रतिष्ठा केली. नंतर स्वयंसेवकाना निर्वाहासाठीं आवश्यक धान्याची व्यवस्था करण्याच्या मागे लागलो.

.सत्याग्रह सुरू झाला. पण ते सर्वच प्रकरण आमच्या आवाक्याबाहेर गेले. आमच्यापैकीं कुणालाच सपाचा अनुभव नव्हता. अगर त्याच्या शास्त्राची तोंडओळख नव्हती. आमचें शस्त्र सत्याग्रह—त्याचा अनुभव तीस—बत्तीसचा. सत्याग्रहाचीं केंद्रे कारखान्या—कारखान्यानी निर्माण झालीं.

मालकाना तयार मालाची आवश्यकता फार होती. त्यानीं एकीकडून तडजोडीच्या गोष्टींना सुरवात केली. दुसरीकडे खेड्यातून नवे मजूर भरणा सुरू केले; आणि तालुक्यात असलेल्या छोटेखानी केंद्रातून काम करवून घेऊं लागले.

आमच्या सत्याग्रहाचे पहिले दहा बारा दिवस नीट पार पडले. परंतु पुढें मात्र मजूर खवळुं लागले. कारण—

बाहेरून येणाऱ्या मजूराची सख्या वाढत होती. ते बेलाशक सत्याग्रह्याच्या अंगावरून चालून जात. विनंत्या–विनवण्याना त्याचें उत्तर म्हणजे अचकट–विचकट आईबहिणीवरून शिव्या आणि उपहासाचे हास्य..."

परिस्थितीची गंभीरता वाढूं लागली. कारण नोव्हेंबरपर्यंत शेतें बहुतेक रिकामीं झाली. शेतीवर काम करून जगणारा मजूरवर्ग खालीं झाला. ते लोक भराभर ह्या नव्या क्षेत्रात येऊन भरूं लागले.

वस्तीची परिस्थिती अत्यत दयाजनक होती. अनेक कुटुंबे आपला उदरनिर्वाह केवळ ह्या व्यवसायावर करीत. त्याचीं रोजची मजुरी बंद होताच, त्याच्यावर उपासमारीचा प्रसंग आला. त्याच्या घरातली चारदोन तोळे चादीही बाजारात निघू लागली. सत्याग्रह किती दिवस चालणार ह्याचा अंदाज कुणालाही नसल्यानें ते गलितधैर्य होऊ लागले.

ही उपासमार आम्ही विचारात घेतली नव्हती. आणि खरें सागायचे तर ही चळवळच आमच्यावर लादली गेली होती. अशा परिस्थितींत चळवळ सावरून धरण्याची ताकत आमच्या अंगात नव्हती. त्यामुळे उघड्या डोळ्यानीं ही उपासमर पहाणे आम्हाला प्राप्त होतें.

. .उपासमारीने तीन आठवड्यात लोक जर्जर झाले. आम्ही पुनश्च तडजोडीची भाषा काढू लागलो.

—आता मालक घोड्यावर होते. ते मजुराचे म्हणणे ऐकायला तयार होईनात. 'ज्याला वाटेल त्याने कामावर हजर व्हावें. जितक्या जागा शिल्लक आहेत तेवढ्याना आम्ही काम देऊ.' असा कोरडा जबाब त्यानीं दिला.

...दुपारीं एका केंद्रात पहाणी करीत असताना अचानक वार्ता आली कीं पूर्वीय केद्रात पोलिस सत्याग्रह्याना उचलून बाजूला सारीत असता, भोंवताली जमलेले प्रेक्षक संतापले. आणि—आणि पोलिसवर दगडफेक झाली. प्रत्युत्तर म्हणून लाठीचार्ज. परिणाम दोन कान्स्टेबल जखमी, दहा मजूर घायाळ !

आम्ही ताबडतोब त्या केद्रात धावलों.

...संध्याकाळीं कोणाचाही सल्ला न घेता—नव्हे सबूर करण्याचा डॉक्टरचा सल्लाही न मानता—मीं व विनयने सत्याग्रह तहकूब केला. प्रत्येक मजूराला बिनशर्त कामावर जाण्याची आज्ञा देण्यांत आली.

आणि—

---

# परिपाक १६

चळवळ थाबवणे सोपे होतें; परतु सत्याग्रहाचें—विशेषतः पराजित सत्याग्रहाचें खरकटे आवरणें किती कष्टाचे काम असतें ह्याची मला काय कल्पना.

सत्याग्रह बद करण्याचा निश्चय होताच आम्हीं शिबिरात गेलों. तेथून प्रत्येक वस्तींत स्वयंसेवक पाठवून कामावर जाण्याबद्दल कामकऱ्याना कळवलें आणि शिबिरातलें सामान जागच्याजागीं पाठवण्याची व्यवस्था करून शिबिर बंद करून आम्ही घरीं आलों.

संध्याकाळपावेतों शहरात १४४ कलम आणि कर्फ्यू ऑर्डर जारी झाली, व शिबिराची जागा पोलिसानीं ताब्यात घेतल्याची वार्ताही आली.

मी ज्या वस्तींत फिरत होतें; तेथले कामकरी माघार घ्यायला अजूनही नाखुष होते. परंतु १४४ मुळे एकत्र जमून विचारविनिमय करण्याची शक्यता उरली नव्हती. शिवाय आम्ही आमचे अंग काढून घेतल्यावर चळवळ पुढे रेटण्याचा दम कोणालाच नव्हता. पोलीसची दडपशाही वाढणार हे उघड होते. कारण आतापावेतों पंधरा प्रमुख कामगार पकडले गेले अशी वार्ता होती.

ह्या परिस्थितीमुळें लोक अधिक गोंधळले. त्यातल्या त्यात जे नरम होते, ते दुसरे दिवशीं कामावर हजर झाले. पण त्याची संख्या लहान होती. आणखी एका आठवड्यात कारखाने भरले; पण.. .

मालकाचा दिवस उगवला होता...... धनाच्या लोभानें, सपत्तीच्या मदाने माणूस उन्मत्त होतो, अमानुष राक्षसी बनतो... पुष्कळ गोष्टी सागून समजत नाहींत. त्या अनुभवाच्या शाळेंतच शिकाव्या लागतात.

त्या शाळेंत मी सध्या विद्यार्थिनी म्हणून दाखल झालें होतें. आणि हृदय पिळवटून निघणारे रक्ताचे अश्रू देऊन नवे ज्ञान आत्मसात करीत होतें.

मालकानीं मजुराच्या मागण्या मान्य केल्या नव्हत्या. आतां कामाचे तास वाढले. रात्रीं दहादहा वाजता थंडीनं कुडकुडत कित्येक कामगार घरीं जातांना भेटत.

मजुरीचे दरही खालीं घसरले. एक हजाराला छाट गेल्यावर पाच आणे वळणावर मिळत असे. ती आता साडेचार आणे झाली. मालकांकडे ह्या तक्रारी आम्ही करून पाहिल्या पण पराजिताचे ऐकते कोण ?

आणि सगळ्यात दुःखदायक गोष्ट म्हणजे ज्या स्वयसेवकानीं व कार्यकर्त्यानीं हिरीरीने चळवळींत भाग घेतला होता, त्याना पुनश्च कामावर घेण्यात आले नाहीं. कारण नव्या मजुराना कामावरून काढण्याची मालकाची तयारी नव्हती. हे दाखवायचे दात असले तरी खायचे दात आम्हाला लागतच होते.

दोन पैसे मजुरी गरीबाना कितीतरी जास्त होते. त्याची उपासमार तात्काल वाढली.

माझ्या मनाला विषाद वाटे; आणि मन पुनश्च संशयाच्या फेऱ्यात पडे.

आमची कुठे चूक तर झाली नाही ? पुनश्च नवीं वादळें निर्माण होत.

त्यातही माझ्या निदर्शनाला, चौकशीअंतीं आणखी एक सत्य आले. दगडफेकीला सुरवात काळू आणि जोति ह्या दोघानीं केल्याचें, त्याच्या जवळ असणारे बरेच कामगार सांगू लागले.

काळू आणि जोति दोघेही फारसे विश्वासू नव्हते. दोघानाही दारूचा नाद होता. आठवड्यात एकाद्यावेळीं तरी बायकापोराना कुबलल्यावाचून त्याचें समाधान होत नसे. कामावरही नियमितपणें जाण्याची त्याची पद्धत नव्हती. कारखान्याच्या मास्तराशीं नेहमी कुरबुरी कागाळ्या व्हायच्या. आणि आठवड्यातून एकादा दिवस कारखान्याला बुटीही मिळायचीच.

त्यानीं पहिले दगड फेकले ही वार्ता कळताच मी त्याची चौकशी केली, तेव्हा दोघानाही कारखान्यात कामावर घेतल्याचें माझ्या नजरेला आलें.

कष्टाळू, प्रामाणिक व नियमित कामगाराना कारखान्यात काम नव्हते. कारण नवे मजूर भरणा झाले होते; आणि जोति नी काळू ?

त्याना कशाचे पारितोषिक होतें हें ? त्याची दगडफेक स्वयं-स्फूर्तच होती का ?

हें जग ! ह्यात नीतीला जागा कुठवर आहे बरें ? आत्मक्लेश– त्याची परमावधि झाली तरी ती मर्यादित आहे ना ?...सारें जग ह्या अति मानुपक अनुपम सुंदर तत्त्वाच्या पखाखाली आणता येईल का ?

अहिंसा–अहिंसा ! ! सत्याचे महत्त्व मला नीट समजत नव्हते. सत्याची आवश्यकता एका मर्यादेपर्यंतच मला सागता येत होती पुढें ? जीवन—जीवनाची वस्तुस्थिती हेच एक सत्य. मानवी जीवनाला आवश्यक परिस्थिती निर्माण करणें हेच एक सत्य. जगात सुख निर्माण करण्यासाठीं, शाति प्रस्थापित करण्यासाठीं, प्रेम वाढवण्यासाठीं जे उपाय उपयुक्त ठरतील तेवढेंच सत्य. सत्याची व्याख्या व्यक्तिगत विचारावर, अनुभवावर केंद्रित होईल. हे नवे विचार मी आत्मसात करून चुकलें होते. माझ्या मनाची खळबळ हा नवीन मार्ग दृष्टीस पडल्यावर थाबली असल्याचा बाऊ मला वाटेनास झाला. जगाकडे पहाण्याची एक नवी दृष्टी आल्या-प्रमाणे वाटले.

पण—अहिंसा. माझ्या जीवनाचे प्रमुख मूल्य. त्याच्यावरच आता तडातड घाव बसत होते. माझा धीर सुटू पहात होता.

विनयचे मनही पुरेसे स्थिर नव्हतें. त्याची तपस्या, त्याचा त्याग, त्याचा अनुभव आणि त्यामुळें त्याचा अधिकार मोठा होता. तोही रात्रंदिवस नव्या अनुभवाचा अर्थ लावण्यात गुंतला होता.

मानवी प्रगतीचा इतिहास अहिंसेची साक्ष देत होता. मानवी स्वभाव शाततेचा भोक्ता प्रत्यक्ष दिसत होता. मनुष्य स्वभवतः हिंस्र असता, तर त्याच्यात समाजप्रियता सापडली असती का ?

मानवी समाजाची धारणा आणि प्रगति हत्येनें, अत्याचारानीं, हिंसेनें झाली होती का ?

बहुजनसमाज परस्पर सहाय्य करूनच जगत होता ना ? श्रम-विभाग हे त्याचेच द्योतक होतें नाहीं का ?

काय सारा समाज आतरिक प्रवृत्तीवर अवलंबून न रहातां, बाहेरच्या नियमानीं बद्ध होऊन शात जीवन व्यतीत करीत आहे ,

पटेना मला ! समाजाची घडी सुस्थितींत ठेवणाऱ्या शक्ति? पोलिस, जेल, सैन्य, कोर्टें—किती किती अपुरें त्याचे बल ! हिंदु-मुसलमान दंग्यातसुद्धा त्याचा प्रत्यय नव्हता येत का ? दगा होऊन गेल्यावर सापडले तर चोर नाही तर सन्यासी बळी देणें—एवढीच गोष्ट ह्या शक्तीच्या हातीं होती ना ?

नाही—मनुष्यस्वभाव युद्धप्रिय आहे, हिंसाप्रिय आहे, हे सिद्ध होणेंच मला शक्य वाटेना. मनुष्य जात्या शातिप्रिय आहे, समाजप्रिय आहे. त्याला आपल्या प्रिय व्यक्ति असतात. त्याच्या रक्षणासाठीं तो जिवावर उदार व्हायला तयार असतो. त्याची आकाक्षा येवढीच—मी आणि माझ्या प्रिय व्यक्ति सुखात असाव्या.

हिंसेची भावना मला मानवी स्वभावात किती क्वचित आढळली होती. उद्योगधंदे, कला व्यापार आणि शास्त्रे ह्याची वृद्धी आणि जपणूक ह्यात योद्धयाचा—रक्तपाताचा हात कितीसा होता ?

मानवी समाज अहिंसेच्याच बलावर सुखी होऊ शकेल; पण—

तो पण पुनश्च माझ्यापुढें उभा राही .

कधीं ? कसा ? आजचा समाज त्या पायरीला पोंचला आहे का ? अधिकाराची लालसा, धनाचा लोभ, स्वार्थाची तृष्णा—अजून आपल्या समाजात ह्याचा धुडगुस आहे. इतराचे अहित करून आपल्या पोळीवर तूप ओढणारे हरीचे लाल थोडे असले तरी जगात त्याचे अस्तित्व आहे.

नव्हे जगातली सारी सत्ता ह्या थोड्या राक्षसाच्या हातातच नाहीं का ? जगात होत राहणारीं छोटीं-मोठीं युद्धें काय शातिप्रिय जनतेच्या संमतीने पुकारलीं जातात ? जनता ओझीं वहाण्याची मालक. फारतर तिच्यापुढें असत्याने भरलेलीं भावनाप्रधान रस-भरित वर्णनें केलीं म्हणजे पुरे—ती आमची लोकसत्ता !

कोर्टात रोज चालणारे खरे-खोटे खटले—सर्वसाधारण माणसाला कुठें वेळ असतो; ही कज्जेदलाली करायला ? म्हणूनच हा धंदा करणारा एक मोठा मार्ग जगात निर्माण होतो ना ?

असे कित्येक विचार उसळत. काहीं दादा खोडून काढी. काहीं मलाच नीट माडता येत नसत. माझे विस्कळित विचार एकत्र करायला मला कित्येक महिने लागले. परंतु अंतःकरणात विद्रोहाच्या ज्वाला प्रज्वलित होऊन चुकल्या होत्या.

मला रात्रीं गतपावली करताना पाहिलें म्हणजे आईचे अंतःकरण तुटूं लागे. ती अंथरूणावर उठून बसे.

" मंजू, लक्षणं बरीं नाहींत तुझीं पोरी. " " घाबरतेस काय अशी ? आईबाप याची माया मोठी वेडी नाहीं ग ? "

" चार दिवस दादाकडे चलतेस ? "

" दादाकडे ? " अगदीं अगदीं क्वचित जात असूं आम्ही कुठे. ती मंडळी चार दिवस आईला भेटायला येत.

मी खरेच वाळत होते, का आईला तसे वाटत होते कोण जाणें. पण मी प्रकृतिसाठीं चार दिवस आश्रम सोडावा असे टुमणें तिनें विनयमागे लावले.

मी एक आठवडाभर बाहेर राहिलें. महेशदादा सबजज्ज म्हणजे मोठा मनुष्य होता. कधीं न येणारी आई–बहीण आल्यानें सर्व मंडळी वरवर करीत होती.

ह्या उमावहिनी म्हणजे महेशदादाची दुसरी बायको. आमचा त्याचा परिचय अतिशय कमी होता. इन्फ्लुएंझात वहिनी नी बाबा बरोबरच वारले. त्यामुळें दादाचे दुसरें लग्न अगदीं शातपणें उरकले होतें. वहिनी गरीब घरच्या पण साधारण शिकलेल्या आणि दिसायला चागल्या होत्या. त्याच्या साऱ्या वागण्यात त्याच्या मोठेपणाची झळक आढळून येई.

महेशदादा आम्हाला परका नव्हता. माझ्या सारखाच आईने त्याला जन्म देऊन वाढवला होता. पण वहिनी ' ह्याना ' काय आवडत नाहीं नी काय आवडते हे ठसकाऱ्यात सागूं लागल्या

म्हणजे मला हंसू येई नी विषादही वाटे. आईसाठीं चार दिवस दादाच्या आवडी बाजूला राहूं शकत नव्हत्या; कारण—वहिनींच्या हातीं सत्ता होती, वैभव होतें.

...माझ्या विचाराची धार इथेही बोथट होईना.

" हीं सारीं पोरं तुझ्या लाडानं बिघडलीं. " तो एक दिवस सहज आईला म्हणाला.

" बाबा, म्हातारपणी नाही शिस्तीच्या धारेवर पोर धरवत. " ती विषादाने म्हणाली.

मी मात्र जरा ठसकाऱ्यानेंच म्हणालें " बरोबर, तुम्ही तिघं वाऱ्यावर वाढलात म्हणून मोठीं माणसं झालात. आमचे आईनीं लाड केले. आम्ही वाह्यात निघालों.

पण दादासाहेब घोडेंमैदान जवळच आहे. पहिलीदुसरीच्या मुलात डावं—उजवं आजच आहे. पाहीन दहा वर्षांनीं काय उजेड पाडता ! "

" काय ग माणसानं तोडून बोलावं. "

" जगात पुष्कळाना वाटतं, खूप पैसे मिळवणं, गाड्याघोडे उडवणं नी दुसऱ्याला पैशापासरी मोजणें हेंच यशस्वी आयुष्य. त्याना कधींतर सत्य सागूं दे आई. "

---

## औदासिन्य १७

" दादा मिठ्ठनलाल शेठ आले आहेत " मधेच कुणीसें येऊन सागितले.

" आलोंच हं "

आणि आठ दिवसात चार पाच शेठानी अशीच पायधूळ आश्रमात झाडलेली मला माहीत असल्यानें मी जिज्ञासेने विचारलें,

" कशाला आले आहेत ? "

" आश्रम पहायला ? "

" ह्या थोरामोठ्याना आजकाल येवढा प्रेमाचा लोंढासा आलाय आपल्याबद्दल ? "

दादा हसून म्हणाला, " एक तर महात्माजींचीं हरिजनबोर्ड नी देशसंचार त्याला कारण आहे. दुसरं आपलं कार्य भरीव आहे असं त्याना वाटायला लागलं आहे अस दिसतं. "

' हं ' मी जरा विषादानेच म्हणाले.

" पैशाचा दीड पैसा नी दीड पैशाचे चार पैसे कसे होतील; ही चिंता ज्याना अहर्निश जाळायची, त्याना परोपकार कधींपासून सुचायला लागला दादा ? "

दादा पायात चपला अडकवून बाहेर जात म्हणाला.

" कोणाही व्यक्तीबद्दल पूर्वग्रह मनात असण बरं नाहीं उज्वल. मी आता जाऊन येतों मग आपण जास्त बोलू. "

दादाचा आत्ता म्हणजे कल्पातच ठरला. जवळ-जवळ शेठजींनीं आश्रम पालथा घातला. दादाला अनेक गंभीर प्रश्न विचारले...

मी गेले तों शेठजी दादाच्या चटईवर कामचलावू लोडाला टेकून बसले होते. त्याची मुद्रा भव्य प्रेमळ व पूर्ण मानवी वाटली मला. त्याच्या तोंडावर एक तेज होते.....

" आश्रमाचें कार्य तर सुरेख आहे बाबा. आम्हाला तरी कुठें अशिक्षित मूर्ख मजूर हवे आहेत. हिंदुस्थानात जोंवर मजूर असेच रहातील तोंवर उद्योगधंदे वाढायचे नाहींत. "

कुशल ( Trained ) मजुराना मजुरी जास्त द्यावी लागेल नाहीं शेठजी ? "

" अरे नाहीं कोण म्हणतो. पण त्यातही आमचा फायदा आहे ना. काम शिकलेला मजूर कामही झपाट्यानीं आवरतो. "

" ठीक आहे शेठजी. "

" परंतु विनयजी, तुमचे सुधारणेचे कार्य अधिक जोमानें आणि त्वरेनीं व्हायला पाहिजे नाहीं का ? "

" उत्साही कार्यकर्ते मिळणं इतक जड नाहीं पण—" पण दादा थोडा अडखळला.

" अडचण पैशाची आहे. " शेठजींनीं त्याचें वाक्य पूर्ण केलें.

" मी तेंच म्हणतों. तुम्ही तरुण पोरं तुमच्यात त्याग आहे, उत्साह आहे, कल्पना आहेत. परंतु तुमचा पुष्कळसा उत्साह नी कल्पना पैशाच्या अभावीं अमूर्तच रहातात. "

सहानुभूतीनें ऐकणारा श्रोता मिळाल्यावर कार्यकर्त्याला काय वाटतें, तें सागून नाहीं समजणें शक्य.

मितभाषी दादाच्या तोंडातून बंदुकीच्या गोळीच्या वेगाने शब्द उडत होते. त्याच्या अनेक योजना तो भराभर सागत होता.

प्राथमिक शाळाचं जाळं साऱ्या जिल्ह्यात नाहीं तरी साऱ्या तालुक्यात पसरलं पाहिजे. ह्या शाळाच ध्येय केवळ अक्षरओळख करून देण हें असून चालायचं नाहीं. शिक्षणाबद्दलच्या साऱ्या जुन्या कल्पना आपल्याला सोडायला लागतील. मनुष्यात उच्च नैतिक मूल्य निर्माण करण्याचं ध्येय ह्या शाळातून ठेवायला हवं. मनुष्य क्षुल्लक कारणासाठीं इतराचे गळे कापायला उठतो; त्याच कारण त्याला शिक्षण मिळत नाहीं जे मिळतें तें योग्य दिशेने मिळत नाहीं.

" तुम्हाला अनुभव बराच दिसतो आहे कामाचा ! आता असं करा तुम्हीं तुमची योजना सविस्तर तयार करा. आपण इथले ४–५ मोठाले व्यापारी बोलावून त्याच्यापुढें ती ठेऊं. त्याना ती योजना पटल्यावर पैशाना तुम्हाला कमी पडणार नाहीं."

विनयच्या चेहऱ्यावर हर्षाच्या रेषा स्पष्ट दिसत होत्या. त्यानें आपल्या आकाक्षा आजवर दाबून ठेवल्या होत्या. आज त्याच्या गुणाचे चीज करणारा माणूस निघाला. त्याला कसा नाहीं हर्ष होणार.

" सत्य संकल्पाचा दाता भगवान् आहे. यानेंच आपल्याला आज इथें पाठवलं शेटजी."

शेटजी उठले. जाताना मला नमस्कार करीत म्हणाले,

" बेन, तुमचा त्याग सर्वात मोठा आहे. परोपकाराच्या कार्यात स्त्रियांचं प्रमाण फार थोडं. त्यांतही, सुशिक्षित नांव घ्यायला नको. आम्हीं मोठे भाग्यवान्—"

मी मध्येंच म्हणालें, " शेठजी, तुम्हीं व्यापाऱ्यांनीं मजुरी ३ आण्यानीं उतरवली, यामुळें गरीबाचे किती हाल होताहेत."

" बेन तुम्हाला अजून अनुभव नाहीं जगाचा. ह्या मजुराना आवश्यक तेवढीच मजुरी दिली तर ठीक. ह्याना साडेचार नाहीं साडेआठ आणे उद्या मिळायला लागले तरी ह्याची स्थिती सुधरेल असं का वाटतं तुम्हाला ? हप्त्याचीं मजुरी हातीं पडते त्या दिवशीं गुत्त्यावर जाऊन पहा जरा. जिथे साडेचार आणे रोज जातो तिथेच आठ आणे रोज जाणार."

प्रेमळपणें हंसून ते अभिवादन करून निघून गेले. त्याचें उत्तर मला कळलें; पण वळेना मात्र. मजूर दारु पितात म्हणून मजुरी कमी द्यायची—इतका एकच उपाय आहे ?

दादा परत आला. मी झोपडीच्या दारात, चौकटीला हात देऊन शून्यपणें उभी होते.

" काय उज्वलाबाई. सगळे व्यापारी सारखे नसतात, हें पटलं का ? हाताचीं सारीं बोटे सारखीं नसतात बर का ? "

मी न बोलता उसासा मात्र टाकला. दादा गुणगुणत होता.

' नहि कस्तुरिकामोदः शपथेनविभाज्यते '

" दादा मला संशय वाटतो खरा. मागे तुला आठवतं का ? मारुति नी रामाच्या शेताच भाडण चाललं होत. आपण नथुमल-कडे गेलों. तो म्हणत होता, " हे लोक लबाड असतात. पैसे देण्यांची त्याची नियत नसते. नी आज शेठजी म्हणतात मजुरी वाढवली तर ते दारू पितील. '

" ही सारी कळकळ किती वरवरची वाटते. जपून रहाशील तर बर ! नाहींतर " मी माझे शब्द अपुरे ठेवले; आणि तेथून निघून आलें.

माझ्या मनातला किंतु काहीं केल्या जाईना. संध्याकाळ-पर्यंत असाच वेळ मी काढला. घटकाभर वस्तींत तेवढी तें प्रकरण विसरलें.

सूर्याचीं सोनसळी किरणें लुप्तप्राय होत होतीं. थंडी वाटूं लाग

त्यानें मी अंगावर शाल लपेटून बाहेर आले. झोपडीच्या चार भितींत अंतरात्मा गुदमरल्याप्रमाणे मला वाटत होते.

बाहेरच्या वातावरणात आल्यावर मनाला जरा शात वाटले. मी आश्रम सोडून बाहेर आले. शक्य तितक्या वेगाने दोन अडीच मैल फिरल्यावर विचार करण्याइतका थंडावा डोक्याला वाटूं लागला. मी परत फिरले. आपला वेग कमी केला.

त्या दिवशीं मला अस्पष्ट कल्पना आली कीं ह्यापुढे आपल्याला आश्रमात स्थान नाहीं. दहा-वीस शाळा काढून चालवल्यानें समाजात जागृति नी सुधारणा होते. क्राति होत नाही. प्रचड उलथापालथी व्हायच्या तर त्यासाठीं साधनेंही प्रचंड लागत असतील.

हजारों वर्षे समाजाला चिकटलेली ही अमानुष रूढि ही जन्माला आली कशी नी इतकीं शतके जगली कशी ? हिंदूसमाज पुराणप्रिय अदूरदर्शी म्हणून का ?

तसें म्हणावे तर बुद्धासारखा एक क्रातिकारक हिंदुसमाजात निर्माण झाला. त्यानें हिंदुस्थानातून हिंदूधर्म नामशेष करीत आणला. त्यावेळीं हिंदू समाजाची पुराणप्रियता कुठे गेली होती ? आणि शकराचार्यांनीं पुनश्च हिंदूधर्माची सस्थापना केली; पण तो धर्मही वैदिक धर्मापेक्षा मूलतः भिन्न असा तिसराच धर्म नव्हता का ?

कृष्ण, बौद्ध, शकराचार्य—ह्या विभूति कालाच्या लाटांवर आल्या आणि गेल्या .....

मग ह्या व्यर्थ भ्रमात मी का फसून रहावें ?

माझ्या अंत:चक्षूसमोर विनय स्पष्ट उभा राहिला.

‘ विनयसाठीं ! केवळ विनयसाठीं !! ’

विनयसाठीं ? विनयसाठीं स्वताशीं प्रतारणा मी करूं शकेन ? स्वताची अशी वंचना कुठवर करिता येईल—आणि करावी ?

...धनिक वर्गानें आमचा आश्रम यशस्वी करण्याचा विडा उचलला होता बहुधा. चार दोन दिवसात कुणीना कुणी भेट देऊन जाई.

दादाच्या निरनिराळ्या योजना तयार होत होत्या. शाळा त्यांत प्रमुख. थोड्या प्रमाणावर औषधालयें आणि विहिरी खोदणें, त्याहूनही थोड्या प्रमाणावर देवालयें बाधणे—जुनीं देवालयें जुने पाणवठे मोकळे करण्याचा प्रश्न पूर्णपणे मागे पडत होता.

मी ह्या योजनात यथातथाच सहयोग देत होते; कारण. .

माझे मन वस्तींत अधिकाधिक रमूं लागलें. माझ्या भविष्याची नाव शीड तुटून वाऱ्यावर भरकटणार असे मला वाटू लागलें होते.

अशा खिन्न मन:स्थितींत वस्तींतल्या गरीब लोकाच्या सुख-दु:खाच्या कहाण्या ऐकून मी स्वताच्या चिंता विसरून जाई. ह्या प्रचड मानवताखडाला कुठे आहे भवितव्य ?

लढाईत लढणाऱ्या सैन्याची स्थिती याची. आजची भाकरी आज खा—उद्याचे गुपित उद्याच्या पोटात राहू द्या.

आणि त्याच्या त्या प्रचड दु:खक्लेशाकडे पाहिले म्हणजे मला माझ्या दुबळेपणाची लाज वाटे, मी उत्साहाने, त्याच्यातील एक होऊन त्याच्या दृष्टिकोनातून जग पहावयाचा प्रयत्न करीं.

नव्या शाळाची योजना तयार झाली. मी सहज त्याबद्दल वस्तींत बोलले. वस्तींत शिक्षण सक्तीचे करवून घ्यावें असे बेत चालले होते. स्त्रीपुरुषानीं माझे म्हणणें २–३ वेळा ऐकून घेतले. नतर मात्र त्याची चर्चा सुरू झाली.

शिक्षण उपयुक्त आहे. आवश्यक आहे. फुकट विद्या देणारीं माणसें परोपकारी असलीच पाहिजेत. सर्व सर्व त्याना मान्य होते. परतु शिक्षणाची सक्ती—बहुतेक सर्व त्याच्या विरुद्ध होते.

"बाई आमचीं पोर सगळा दिवस काम करतात. पोरं संभाळतात. बापाला भाकरी पोचवतात. गुर राखतात."

'नी उपास पडायला लागले तर भीकही मागून आणतात' एक फटकळ बाई हंसून म्हणाली.

"हो ग ? पोरं भीक मागायला पाठवता ? मला नवीन होती ही गोष्ट."

"मजुराचीं पोर नाहींत सहसा जातबाई; पण सफाई करणाऱ्या महारांचीं नेहमीं जातात."

“ शाळेंत मुलाना पाच ते आठ वर्षापर्यंतच रहाव लागेल. ”

“ तीन वर्षे पोरं पोशील कोण ?...” त्याचे सगळें जग वेगळें. त्याचा दृष्टिकोण अगदीं दुसऱ्या ध्रुवावर. तिथें प्रत्येक प्रश्न पोटा-पाशींच येऊन अडके.

मला वाटूं लागले. जग मिळवून खाण्यासाठीं जन्माला येतें नी त्या धडपडींतच मरते. सौंदर्य, कला विद्या, ही सारी रिकाम-पणाची कामगिरी !

त्याग, धर्म, उदारता साधुता, भरल्या पोटावर उचललेला बेलभाडार—का लष्करच्या भाकरी ?

---

## जाणीव १८

“ अशी अनाथासारखी काय बसली आहेस इथे ? ” ओंजळीं-तील फुलें माझ्या पदरांत ओतीत विनय म्हणाला.

जानेवारी संपत आल्याने थंडी ओसरली होती. शुक्लपक्षातल्या चंद्राचें चादणे बाहेरच्या वनश्रीबरोबर सौंदर्याची बहार लुटीत होते. वातावरण शात—निस्तब्ध. त्या निस्तब्धेतलें मूक सगीत किती मधुर होते. निसर्ग आणि मानव ह्याच्यात बसणारे अन्योन्य संबंध मनाला स्पष्ट प्रतीत होते. सृष्टीची चित्तवृत्ती धीरगंभीर परंतु काहींशी विषण्ण होती—प्रियकराच्या स्कंधावर मस्तक विसावून त्याच्या वियोगाशकेने आकुल होणाऱ्या दयितेसारखी.

माझ्या मनात न जाणे कसला खेद अथांग भरला होता. बाहेरचे मृदु—विरल मेघपटलामुळें मृदुतर चादणेंही माझ्या मनातील खेद बाहेरच्या जगाला प्रकट करून दाखवील, अशी शंका सूस मनाला होती कीं काय कोण जाणे, बाहेर जाऊन बसण्याची कल्पनाच मला पटली नाहीं. झोपडीच्या बाहेरच्या झांपरीत आरामखुर्चीवर मी पडलें होतें. वरून सर्व शांत भासत होतें. पण आंत मात्र जोराचे प्रवाह सुरू असावेत, कारण मला अतिशय अस्वस्थ वाटत होतें. आज मला तीव्रतेनें अश्रू गाळ-ण्याची इच्छा झाली होती.

इतक्यात विनय तेथें आला...

—मी त्याच्या प्रश्नाला उत्तर दिलें नाहीं. तोंड उघडून बोलण्याची इच्छा नव्हती मला. काहीं दुःखेच अशीं असतात कीं त्याना वाचा नसते. ओठाच्या उंबरठ्यावर तीं अडून पडतात.

जाईच्या फुलाचा सुगंध दरवळला. किती गोड, किती कोमल!! त्या सुवासानें न जाणे माझ्या हृदयवीणेची कुठली तार छेडली. मी एकदम दचकलें. माझे अंग शहारले. डोळ्यात आसवें गोळा झालीं.

विनय स्तब्ध उभा होता. आमच्या हृदयाचे स्पदन अजूनही एका तालात बसत होते का ? माझ्या मनोयातनाची त्याला कल्पना होती का ? माझ्या हृदयात पेटलेली एकलेपणाची आग त्यालाही जाळीत होती का ?

ते मला माहीत नव्हतें, नी समजणेंही शक्य नव्हतें. विनयची वृत्ति बरीचशी अतिमानुष होती; निदान माझ्या मनाचा तसा ग्रह होता. आश्रमात आल्याला मला आज नऊ–दहा महिने होत आले होते. माझ्या हृदयातल्या मृदु, यौवनसुलभ भावना मी यशस्वी रीतीनें लपवल्या होत्या. विनय आणि मी प्रथम दोन कुड्या एक प्राण, असे साथी होतों. हळुहळू ही परस्पर संन्निधना नष्ट होत गेली. माझ्या विचाराचे सूर निराळ्या दिशेनें वाहूं लागले. आणि आता तर त्याच्या कार्याकडेही मी उदासीनपणे पहात होते. गेल्या महिन्यात आश्रम माणसानी गजबजला होता. नवनव्या व्यक्ती नित्य येत आणि जात. रोज नव्या योजना तयार होत. परतु मी आवश्यक तितकेच सहकार्य देई. बाकीचा वेळ वाचनात किंवा वस्तींत घालवीं. आश्रमात येताना बरोबर आणलेला उत्साह कधींच संपला होता. दलिताच्या उद्धाराची भाषा माझ्या मुखात तर काय हृदयातही उरली नव्हती. कारण— उद्धाराची भाषा दुसऱ्या व्यक्तीबद्दल बोलता येते. स्वताबद्दल नाहीं. वस्ती आणि वस्तींतली सुखदुःखें माझ्या जीवनातला भाग झालीं होतीं.

माझी उदासीनता अलिकडे जाणवूं लागल्यामुळें कीं काय गेल्या आठवड्यापासून विनय पुनश्च माझ्याकडे आकर्षित होत होता. तो दिवसातून तास दीडतास माझ्याशीं सहज गप्पासाठीं येऊन जाई. पण—आमच्यात एक अतिशय जाड पडदा निर्माण झाला होता. किंवा त्याच्या हृदयात डोकावून पहाण्याइतकीही जीवनशक्ति मला उरली नव्हती...

" फिरायला चलतेस." मी उठून उभी राहिलें. पायात चपला अडकवल्या.

" आई मी दादाबरोबर फिरून येतें ग."

" फार वेळ नका बाहेर राहू अं ! "

रस्त्यातही आम्ही निःशब्द होतों. विनयचा सहवास मला पाहिजे होता, आणि नकोही होता. मला आठवण झाली. तीन महिन्यापूर्वी मी व डॉक्टर वस्तींतून उशीरा परतलों. डॉक्टराची चादर अंगाभोंवतीं लपेटताना विनयची आठवण मला किती तीव्रतेने आली होती. आज विनयबरोबर असूनही माझ्या मनात दोन परस्पर विरोधी भावना निर्माण झाल्या होत्या.

ह्या अर्धजागृतींत आम्हीं किती वेळ फिरत होतो कोण जाणे. अखेर विनूच्या शब्दानीं मी जागी झालें.

" बसूं या का ह्या पुलावर आपण ? "

पुलाचे दगड दंवानें ओलसर झालेले होते. त्याच्यावरच आम्ही दोघें जाऊन बसलों.

" उज्वल, तुझी मनःस्थिती आजकाल इतकी विषण्ण का आहे ? "

" खरं ? मला तर नाहीं माहीत." मी स्मित करीत उत्तरले.

" अशी प्रतारणा करून भागेल असं वाटतं तुला ? मी आज कित्येक दिवस पहातों आहे. तुझा बोलका हंसरा स्वभाव अजिबात लोपल्यासारखा वाटतो. तुझी वाद घालण्याची आवड निमालेली दिसते. तुझ्याभोंवतीं चाललेल्या खळबळीचा तुला स्पर्शही होतो किंवा नाहीं ह्याची मला शंका वाटते. "

" बराच वेळ मिळतो तुला आजकाल." मी विनोदानें म्हणालें.

थट्टा नव्हे ही उज्वल. आपल्याला अजून हिमालय ओलाडायचा आहे. द्रौपदीप्रमाणें तूं तर पायथ्याशींच थकायला लागलीस. इतकेंच नव्हे तर तू स्वताच्या मनाला कसलाही बाध घालण्याचा प्रयत्न करीत नाहींस. मनाला अनेकदा उदास वाटतें. नाहीं असें नाहीं. आपले कार्य हिमालय उल्लंघण्याइतके नव्हे अधिक कठीण आहे परतु धैर्य धरून विपत्तींचा सामना केला तरच तरणोपाय. ”

“ तूं धर्म आहेस साऱ्या विपत्तीला तोंड द्यायला. द्रौपदीचं काय—ती मार्गातच खलास व्हायची. ”

“ तुझ्या निराशेत कडवटपणासुद्धा आहे उज्वल. ”

“ दुसरं काय होणं शक्य आहे ? गेल्या महिन्यात माझ्या डोळ्यानी जीं करुण दृश्ये पाहिलीं ऐकलीं त्यानीं माझं हृदय हलून गेलंय. ह्या करुण–निघृण दारिद्र्यात निर्विकार मनानें फिरण्याइतका वेदातीपणा माझ्या अंगात नाहीं. माझ अंतःकरण पिळवटून येतं.”

“ तो वेदात आमच्याही अंगात नाही म्हणूनच आश्रम जन्माला आला ना ? ”

“ मला शका वाटते. आश्रम जन्माला येण्याचें कारण तुम्हाला वाटणारी सहानुभूति नाहीं—तर सत्याच्या—न्यायाच्या बाजूने लढण्याचे तुमचे तत्त्व आहे. ”

“ न्यायासाठीं जो सर्वसग परित्याग करतो, त्याला अन्यायाची चीड आणि दलिताबद्दल सहानुभूति नसते असें म्हणणे म्हणजे धाष्टर्य आहे उज्वल. ” तो जरा तीव्रपणे म्हणाला.

“ फरक सूक्ष्म आहे. पण तोच महत्त्वाचा आहे विनू. तुझ्यामते अस्पृश्यता म्हणजे सामाजिक बहिष्कार. ह्या बहिष्काराचे मूळ एक पुरातन अन्याय रूढि. ही जाचक रूढि तोडायला तू सर्वत्याग करायला तयार.

हेंच चित्रही दहा महिन्यापूर्वी माझ्याही अंतःपटावर होते. आज—आज मला नाहीं पटत हें. दलिताचीं दुःखं सामाजिक बहिष्कारानीं निर्माण झालीं नाहींत. आणि ह्या बहिष्काराचीं पाळंमुळं खणून त्याचं परिमार्जनही व्हायचं नाहीं. ”

" म्हणजे अस्पृश्यता खणून काढायचे आमचे प्रयत्न बालिश आहेत तर ! "

" असं मी कसं म्हणूं ? आपल्या शत्रूंनीं वेळोवेळीं ह्या रूढीचा उल्लेख करून आपल्याला हिणवलं आहे. तेव्हा आपल्या शत्रूच्या हातचं एक हत्यार बोथट करायला त्याचा उपयोग होईल येवढेच.

" तुला असं कसं म्हणता येईल. शत्रूची जिव्हा बोथट करणं येवढंच नैतिक मूल्य आपल्या त्यागाला असेल तर मी राष्ट्राला तेवढ्यासाठीं त्याग करायला सागणार नाहीं. परतु अशिक्षित बहुजन समाजाला सुशिक्षित करण्याच पवित्र कार्य आज आमच्या शिरावर आम्हीं घेतलं आहे.

" दैवायत्तं कुले जन्म मदायत्तं तु पौरुष " असें अभिमानाने म्हणण्याचा हक्क आम्ही दलिताना देतों आहों. स्त्रियाना आणि अस्पृश्याना आमच्या बरोबरीने हक्क देण्याची आमची इच्छा आहेच. परतु ते हक्क त्याना उपयोगिता यावेत म्हणून ना हा सारा खटाटोप ? "

" हं ! आणि मार्ग काय ? थोडीं देवळं बाधणं, काहीं विहिरी मोकळ्या करणं, प्राथमिक शिक्षणाचा प्रसार करण, जणू स्पृश्य देवळात जातातच दर्शनाला ! सारे मराठे ब्राह्मण वेटाळातच पाणी भरतात. आणि आजही अस्पृश्याना पाणवठे उघडले तर आपलीं पोटाचीं कामं सोडून ते हा हक्क बजावायला शहरात जाणार आहे ? अस्पृश्य अस्पृश्य आहेत म्हणूनच जणूं त्याना स्वच्छ रहाण्याची जरूर आणि प्राथमिक शिक्षणाचे महत्त्व. तुमचा बहुतेक शेतकरी वर्ग कुणबी-माळी अशिक्षितच आहे विनय.

हें जें थोडंसं कार्य सुरवातीला होत होतं, त्याच्यावरही बोळा फिरवायच्या युक्तया सनातनी काढतातच आहेत. परवा मारुतीच्या देवळाचा कोणशिळा समारंभ तुम्हींच करवलात ना ? अस्पृश्याना स्वतंत्र देवालयं बांधून देऊन का अस्पृश्यता नष्ट होणार आहे ? "

" तुझ्या विचारात जबर विकृति निर्माण झाली आहे. तुला

जिकडे पहावें तिकडे तांबडी चिंधीच दिसते आहे. डॉक्टरशीं तुझी वाढू पहाणारी मैत्री त्याला कारण नाहीं ना ? " तो उद्वेगानें म्हणाला.

मला त्याच्या शब्दाचें आश्चर्य वाटलें. डॉक्टर व मी विचार-विनिमय करीत असूं पण त्याच्या विचारामुळें माझें 'मस्तक विकृत होत असल्याची ' मला कल्पनाही नव्हती. मी क्षणभर तीक्ष्णपणे त्याच्यावर नजर रोखून म्हणालें,

" कोण जाणें माझें मस्तक विकृत होतें आहे का तुमची नजर दूषित! गरीबांना पिळून काढणारे अत्याचार तुम्हाला आज दीड वर्षात दिसूं शकले नाहींत. दुधावाचून तडफडून मरणारीं त्याचीं पोर--पोर दवाखान्यात आलं म्हणजे त्याचं पोट दाबून पहाणार तुम्ही. त्याचं ते सुरकुत्या पडलेलं शरीर, बाक आलेली हाडं, गारगोट्या झालेले डोळे--' मुडदूस ' तुमचा डॉक्टर म्हणणार नी ' काली फॉस ' च्या गोळ्या देणार. तुमच्या मद्द डोक्यात येतं कारे--कीं कॅलशियमच नव्हे तर सारींच जीवनसत्वं त्या निरपराध बालकाला पारखीं आहेत ?--कीं त्याच्या अभागी आईला पोटभर साधी भाकरी मिळत नाहीं. कीं पोर धड दहा दिवसांचं होत नाहीं तों चार आण्यासाठीं ती धडपडत मजुरीला बाहेर पडते, आणि भिकार अपुरं अन्न आणि अतिश्रम ह्या जोड-गोळीमुळं तापानी तिच्या अंगात घर केलेलं असत. तुमच्या त्या ' कालिफॉस 'च्या चार गोळ्यानीं तें पोर जगेलसं तुम्हाला वाटतं. कोणाची दृष्टि विकृत आहे विनय, माझी कीं तुझी ? मी तर म्हणतें उगीच औषध देण्याचे श्रम तुम्हाला...नी त्यातून निष्पन्न काय होणार ? तुम्ही मोठाले पुढारी बनणार, तुमचे शेठसावकार औदार्याचे झेंडे मिरवणार. "

माझा कंठ दाटून आला. जीं अनेक हृदयविदारक दृश्यें मी पाहिलीं होतीं तीं माझ्या नजरेसमोर धावूं लागलीं.

ह्या मानवी यातना काय तात्त्विक चर्चेचा विषय होऊं शकत होत्या ? नीति आणि जीवन. विश्वामित्रानीं मांगाच्या घरांतून

कुत्र्याची तंगडी चोरून आणून खाल्ली होती. आणि शेजारच्या शेतातून चार मुठी तुरीच्या शेंगा आणून खाल्याबद्दल वस्तींतल्या दोन मुलाना पाच पाच फटक्यांची शिक्षा झाली होती.

धनुर्वाताचे इंजेक्शन फार महाग म्हणून एक ऐन उमेदीचा तरुण, आपल्या वृद्ध पितरांना आणि दोन अल्पवयी पोराना स्वताच्या नशिबाची परीक्षा पहायला सोडून इहलोकातून परागंदा झाला होता.

शेतात काम करीत असताना साप डसून एक प्रौढ स्त्री, डॉक्टर वेळेवर न सापडल्यानें जिवाला मुकली होती.

अशीं किती—किती दृश्यें होतीं. तीं मला दिसत, माझा जीव तळमळे; हीच माझी विकृति ?

मला एकदम कोरडा हुंदका आला. दोन्ही हातानीं तोंड झाकून मी हुंदके आतच दाबण्याचा प्रयत्न करीत होते.

विनयचा हात माझ्या खाद्यावर मला जाणवला. मला विजेचा झटका बसल्याप्रमाणें वाटले. माझे हुंदके थाबले. कुठल्यातरी तिरस्करणीय वस्तूच्या स्पर्शानें मनाला जी शिसारी येते तीच मला आली. मी उडी मारून उभी राहिले.

" उशीर झाला. आई वाट पाहील. " विनयच्या उत्तराची वाट न पहाता मी चालूं लागले.

---

## प्रत्यावृत्ति १९

सकाळीं जागी झाले तों उन्हे आलीं होतीं. डॉक्टर आत येत विचारीत होते.

" काय ताई प्रकृति तर ठीक आहे ना ? "

मी चटकन उठून बसले. विनयचे कालचे शब्द मला आठवले. डॉक्टराच्या सहवासानें माझा मेंदू विकृत होत होता तर ! मला हंसूं आलें.

" प्रकृतीला काय झालंय्‌ बुवा माझ्या ? "

" काय झालंय् ! आई ह्याची प्रकृति अलीकडे जरा घसरलीशी नाहीं वाटत का ? " मला उठवायला आत येणाऱ्या आईला त्यानीं प्रश्न केला.

" तुम्ही म्हटलं तर घेईल ऐकून. माझं म्हातारीचं कोण ऐकणार ? साऱ्या दिवसरात्र जिवाचं रान करून वस्तींत हिंडता सारीं. आणि ही तर मनाची हलकी. रात्ररात्र नीट झोंप नाहीं येत. म्हटलं तर म्हणते ' आई गाद्यागिरद्या सगळयांच्या भाग्यांत नसतात बरं का ? "

मी तोंड धुवून आले. आम्हीं चहा घेत असताना आईनें पुनश्च माझ्या प्रकृतीचा विषय काढला. तिच्या मनाला डाचतच होता तो फार दिवसापासून.

" तुमच तोंड ह्या वेळेलाही उतरलेलं दिसतय् ताई. ताप तर नव्हता काल ? "

" कसलं काहीं तरी घेऊन बसला आहात. ताप यायला झालंय काय मला ? खाते-पितें उड्या मारते. "

आईनें केवळ उसासा टाकला. डॉक्टरही त्या वेळीं बोलले नाहींत. परंतु त्याना माझे शब्द पटले नसावेत. संध्याकाळीं ते ' तापमापक ' घेऊन आले.

" ९९.५ "

" मग निजू अंथरुणात आता ? नी खायला काय देणार ? साबूदाणा ? " आईकडे वळून खोटेंच कण्हत म्हणाले.

" डोकं दुखतय् ग. आई-आई गऽऽ "

माझ्या त्या कण्हण्यानीं आईलासुद्धा हंसू आले. तिनें अंथरुण पसरून मला निजायला लावले.

मला मनापासून शरम वाटली. साठ वर्षाची माझी वृद्ध आई, माझी सुश्रूषा करणार नी मी ' ९९.५ तापात ' निजून रहाणार. "

" कोयनेल द्यायचं का डॉक्टर ? "

" नको आई. त्याचा ताप श्रमाचा आहे. " आई माझ्या उशाशीं हरिविजय घेऊन बसली.

मी डॉक्टरना म्हटलें " श्रम कसले डोक्याचे ? "

' डोक्याचेच ! ' काहीं क्षण ते स्तब्ध होते, नंतर म्हणाले, " तुमच्या विचारशक्तीवर विलक्षण ताण पडतो आहे सध्या. तुम्हीं धैर्यानें त्यातून पार पडण्याचा प्रयत्न करता आहा ताई. पण मला वाटतं शरीराचा अंत पहाणंही बरं नाहीं. "

मी क्षणभर थाबले. माझ्या मनोभूमीचे समरागण बनवणारे परस्परविरोधी विचार पुनश्च एकत्र जमत होते.

" उपाय काय डॉक्टर त्याला ? होकायंत्र हरवलेल्या होडी-सारखी स्थिति झाली आहे माझी. दिशा समजत नाहींत. कुठें जावें कळत नाहीं. "

" मानवी आयुष्यात असे प्रसंग अनेकदा येतात. जुने स्तंभ पोखरून कोसळायला लागतात. नवीन चटकन हातीं येत नाहींत. परतु अशा प्रसंगीं भावनावश होऊन चालत नाहीं. "

" मनुष्याचे जीवन भावनेवर असत. भावना बोलावल्यानं येत नाहीत. थाबवल्यानं थाबत नाहींत. त्यातून माझं मन दुबळं आहे. क्लेश मला काढवत नाहींत; दुसऱ्याचे पहावत नाहींत. "

" तुमच्या मनाची खळबळ—तिची खोली मला अजमावता येते. पण ह्या खळबळीचे कारण केवळ क्लेश नाहींत ताई. त्याचीं मुळे पुष्कळ दूरवर आहेत. "

पायात काटा मोडल्याने क्लेश होतात; आपण सुई घेऊन तो काढून टाकतो. परंतु एखाद्या वेळीं जंगलात रस्त्यावर काटा मोडला आणि तो काढायला सध्या तरी साधत नाहीं असं वाटलं म्हणजे मनाला जी अस्वस्थता येते ती जास्त त्रासदायक, प्राणघेऊ असते."

डॉक्टराचे शब्द मला एकदम पटले. अगदीं हीच कल्पना माझ्या मनाला शल्यासारखी वाटत होती.

माझ्याभोंवती क्लेश होते—यातना होत्या. त्या दारुण यातना-पेक्षाही, ' जग असेच चालायचें, अन्याय असेच व्हायचे. निदान मी दुःख लेशभर कमी करूं शकत नाहीं' अशी असहायतेची भावना माझ्या हृदयात डोकावली म्हणजे माझे हातपाय गळून जात.

मला मिळालेला पहिला हुकूम म्हणजे वस्तींत जायची बंदी.

" माझं काम कोण करील ? "

" जाऊं द्या झालं. पसतीस कोटी हिंदुस्थानचं आपल्या व्यक्तिगत त्यागावाचून अडून पडेल, अशी खोटी कल्पना नका करून घेऊ. "

" प्रत्येकानीं असं म्हटलं म्हणजे झालं. नी तुम्ही कशाला आलांत ह्या मार्गाला ? "

" लोककार्यासाठीं नाहीं. स्वतःच्या समाधानासाठीं. कोणाला कशाचं वेड कोणाला कशाचं—तसं माझ एक वेड आहे हें. उद्या मी कार्यक्षेत्रातून उठलों तर नवे वेडे येतील पुढे. "

डॉक्टराचे विकृत विचार !! असतीलही. नाहीं कोणी म्हणावे ? जगापेक्षा त्याचा दृष्टिकोण निराळा होता ना ? मला त्यात नाविन्याची प्रसन्नता प्रतीत झाली. त्याच्या विचाराला नव्हती त्यागाची घाण न आकाक्षेची दुर्गंधि ! अशींच वेडीं माणसें जगाच्या कल्याणाची चिरस्थायी कार्ये करून जातात.

माझी जरा खालावलेली प्रकृति, मनाचा मावळलेला उत्साह, आणि डॉक्टराच्या मनाचा विक्षिप्त नवेपणा ह्यामुळें माझी त्याची घसट चटकन वाढली.

शिवाय, मनात कुढल्यानं तुमचं दुखणं वाढेल. येतील ते बरे वाईट विचार ओकून टाकीत जा.' हा त्याचा सल्ला मी तात्काळ उचलल्याने आमचा विचारविनिमयही बराच होई.

..." मेडिकलचं शेवटचं वर्ष होतं माझं. सत्याग्रहाची हाक ऐकली नी बाहेर पडलों. "

" पश्चात्ताप नाहीं वाटला तुम्हाला ? तेवढें वर्ष पदरात पडते तर—"

" उडी मारून आत पडणारे, पोहायला शिकतात. एक वर्ष पुरं करूनच काय दिवे लागणार होते. माझ्या कामापुरतं ज्ञान मला आहेच M. B. B. S. होऊन प्रॅक्टिस केली असती तर पैसा मिळाला असता. पण तोही दैवाचाच भाग आहे."

" गरीबाना मदत करायला अधिक सोपं गेलं असतं."

" स्वप्नं आहेत तुमचीं हीं. पैशाच्या मागं लागलेला मनुष्य गरीबाना तेव्हांच विसरून जातो. शिवाय इंग्रजी शस्त्रक्रियेचीं साधनं नी उपचार इतके महाग आहेत कीं प्रॅक्टिसच्या मागे लागल्याविना कुठल्याही डॉक्टरला गरीबाची सेवा करणं शक्य नाहीं."

..." सत्य–अहिंसा हीं मृगजळासारखीं आहेत. धरायला गेल कीं पुढें पुढे सरकतात."

माझ्या जखमेला हात लागल्याप्रमाणें वाटलें मला. मी आर्तपणानें म्हटलें.

"डॉक्टर, जीवनाचीं मुळ अशीं खणून नका काढू. तुमच्या सारखंच मलाही वाटूं लागत कधीं कधीं. पण हीं मुळं आपण नष्ट केलीं तर मानवी समाजाची धारणा कशी होईल ?"

" खरं आहे तुमचं म्हणणं. ह्याच विचारात मी गेले कित्येक महिने नष्ट केले आहेत; आणि डोक्याचे स्क्रू ढिले असल्याची कीर्ति कमावली आहे."

" गतानुगतिकाचं जाऊ द्या. मी नव्या दृष्टिकोणानीं पहायला सदा तयार आहें. पण तो बुद्धीला पटायला पाहिजे."

ते मृदुपणानें म्हणाले, " काय पटत नाहीं तुमच्या बुद्धीला ? निर्भेळ सत्य अशी काहीं वस्तू आहे अस वाटतं का तुम्हाला ?"

" जीवनाकडे पाहिलं म्हणजे नाही आढळत. पण म्हणून तें मूल्यच नष्ट करता येईल का ?"

" तें मूल्य नष्ट करण्याची काय आवश्यकता ? त्याची व्याख्या बदलायला पाहिजे. आणि बरोबरच हेंही लक्षात ठेवायला पाहिजे कीं जशी जमीन तशीं फळं धरतात. ज्या समाजात कोणतेंही पाप अंधेरात पचूं शकतें, तो समाज सत्याचीं रोप उगवूंच शकत नाहीं. त्या गोड वेलाना कडू शेंदन्याच लागतील ध्यानात ठेवा."

" केवढं कडू सत्य आहे हें." मी उसासा टाकीत म्हणालें. " तुम्हाला आठवतं का ? मला वाटतं तुम्ही बनारसला गेला

होतात. तुमच्यामागें एका पाटलाच्या घरावर दरवडा पडला. त्यात आठदहा मंडळी पकडली गेली. दादाचें दोघावर वजन होतें. त्यानीं गुन्हा कबूल केला. ते चार-चार वर्षांसाठीं गिट्टी फोडायला गेले. नी त्याचा नायक हायकोर्टापर्यंत भाडून सुटून आला."

" अशीं अनेक उदाहरणें दाखवता येतील. अहिंसेची तीच अवस्था."

आपण अहिंसेच्या तत्त्वामागे लागून सत्याग्रह थाबवला. माझ्या मनाला मागचं खरकटं काढताना असंच वाटायला लागलं. ...पण मी स्त्री आहें म्हणून म्हणा—किंवा भेकड म्हणून म्हणा. रक्तपाताला माझं मन घेत नाहीं."

" अहिंसा हा शब्द मुळीं नकारार्थी आहे. त्या अहिंसेला स्वताचा रंगरूप काय असणार अशा वेळेला."

" महात्माजींची व्याख्या तर अतिव्यापी आहे. दुसऱ्याच्या मनाला दु:ख देणारी ती हिंसा. आणि ही हिंसा ज्यात नाहीं ती अहिंसा" डॉक्टर हंसत म्हणाले.

" येवढी अतिव्याप्ती सोडली, आणि 'परस्परांच्या सहाय्यानें सामाजिक जीवन सुखकर करणारी' ती अहिंसा म्हटली तरी ह्या अहिंसेलाही आपल्या जगात वाव दिसत नाहीं."

" पुन्हा ज्याच्या हातात शस्त्र आहे त्याला ते म्यान करतां येईल. ज्याच्या हातात सत्ता आहे; तोच तिचा सदुपयोग करील.

" बुद्धाने अहिंसेचा सदेश दिला, पण त्या संदेशाचें सौंदर्य उदारता अशोकालाच सिद्ध करता आली. त्यालाच असेतुहिमाचल शाति प्रस्थापित करता आली. ज्या जनतेच्या हातीं कोणतीही सत्ता नाहीं—जिच्यावर नित्य नवे अत्याचार होतात, आणि हे अत्याचार सोसून घेणें हेंच जिचें जीवन, त्या दुबळ्या जनतेला अहिंसेचा संदेश पोंचवण्यात काय अर्थ?"

" सत्ताधारी आपल्या गुर्मीत आहेत. त्याना मानवी हृदय नाहीं, नी समाजाची जरुरही नाहीं."

" त्यांना मानवी हृदय नाहीं, हें मला मान्य आहे. परंतु

समाजावाचून त्यांचें चालणें शक्य आहे ही मात्र कविकल्पना आहे. मी म्हणतों ह्याचे घरकामाचे नोकर चार दिवस न आले तर कशी दुर्दशा होते ह्याची.

ह्याना समाजाची आवश्यकता नाहीं; तर हे कारखाने, हा व्यापार, हा खटाटोप कशासाठीं? नफ्याच्या एका एका पैशा-साठीं हे सत्ताधारी कसे अविश्रात श्रम करतात, हे तुम्ही पाहिलं आहेत का कधीं?

ह्यांना समाज नको तर हे कारखाने कोण चालवणार, आणि कारखान्याच्या उत्पादनाला गिऱ्हाइक कुठून मिळणार? ह्याची मिजास पैशावर चालते सारी. आणि त्या पैशाला समाजाच्या अस्तित्वामुळें मूल्य आहे ताई.

" हे त्याना पटवायचं कसं? विजयनी मेमध्यें नथुमलला धडा दिला. पण तो किती अपुरा किती अयशस्वी."

" त्याचं मुख्य कारण, अहिंसेचे आपण माजवलेले देव्हारे. रक्तपात नसावा, कारण मनुष्याच्या दुष्ट वासना एकदा जागृत झाल्या म्हणजे तो कोणत्या थराला जाईल ह्याचा नियम रहात नाहीं. हिंदुमुसलमानाचे दंगे म्हणे ह्याला साक्ष आहेत."

आपल्याला समाजाचे सारे घटक सुखी करायचे आहेत. सर्वांना माणुसकीचे हक्क द्यायचे आहेत. गोबीच्या वाळवंटातून अन्नामागें सैरावैरा सुटणाऱ्या मोंगलाचे अनुकरण करायचे नाहीं."

अशा चर्चेनंतर माझ्या मनातलें धुके पुष्कळसे निवळूं लागे. मनाला शातता वाटे. पुढचा मार्ग अंधुक कां होईना दिसूं लागे.

...ताई मला वाटतें तुम्ही ह्यापुढें आश्रमात न रहाल तरच बरें."

" मी माझ्या इच्छेने का आलें इथें?"

" आतापर्यंत सगळें ठीक होते. परंतु आता ताईंच्या इथें रहाण्यात अर्थ नाहीं दिसत मला. घरीं गेल्यानं वातावरण बदलेल त्याना हुशारी लवकर येईल..."

आश्रमात रहाण्याची निरर्थकता मलाही हळूहळू पटत होती.

अखेर ह्यापुढें काम घरीं राहून करायचे मी ठरवलें. आणि विनयच्या इच्छेविरुद्ध आश्रम सोडला.

—घरीं येताच मला एकाद्या अत्यत त्रस्त करणाऱ्या स्वप्नातून जागल्याप्रमाणें वाटले.

---

## पित्याचें प्रेम २०

त्रयोदशीचा चंद्र माथ्यावर येऊन आपली किमयाकारी किरणे कालिंदीच्या सथ कृष्ण आणि विस्तीर्ण जलाशयावर अव्याहत ओतीत होता. त्या मधुर स्पर्शानें पुलकित झालेल्या यमुनेच्य श्यामल देहावर जललहरींचे रोमाच चमकून उठत होते. परतीरावर दूर क्षितिजाला भिडलेल्या काळ्याभोर राई—निशा वधूच्या खाद्यावरून खालीं ढळलेल्या शुभ्र पदराच्या कृष्ण किनारीप्रमाणें भासत होत्या. उजवीकडे पसरलेला रेलवेचा प्रचंड पूल धन्याच्या पायाशीं पडलेल्या कुत्र्याप्रमाणे दिसत होता.

त्या अकल्पित सौंदर्याच्या ऐश्वर्याने स्तिमित होऊन मी क्षणभर उभी राहिलें.

" खालीं उतरायचं आहे आपल्याला." मागून मृदु आवाज आला. मी दचकून मागे पाहिले.

' साभाळून ह ' सरस्वती घाटाची दरड अगदीं उभी असल्याने तोल चागला जपावा लागत होता. आमच्या बरोबरचीं मुले केव्हाच खालीं उतरून बोटींत बसलीं होतीं. आज सरासरी दीड वर्षानंतर, यौवनात निर्माण होणाऱ्या सौदर्योन्मादाचा माझ्या हृदयात उद्गम झाला होता. त्या मदात मला इतर कोणाचेंही अस्तित्व जाणवत नव्हतें, स्वताच्या पायावर माझा ताबा नव्हता. त्या उतारावरचा एक छोटा दगड किंचित सरकला आणि माझा तोल गेला. चटकन माझा हात दादानीं घट्ट धरला, आणि मला सावरून उभी केली. मी कृतज्ञतेने वर पाहिलें. चंद्राचीं रजत किरणें, त्याच्या रुपेरी केसावर चमकत होतीं. ते फक्त हंसले.

परक्या स्पर्शामुळें मला किंचित संकोच वाटला. मी आपला हात हळूच सोडवून घेतला. ते पुनश्च हंसले व म्हणाले,

" अखेर हिंदूच. "

आम्ही बोटींत बसलों. बरोबरच्या नोकरानें बसण्याच्या जागीं मऊ शुभ्र गाद्या पसरल्या होत्या. दादांनीं दोन चार उशा आपल्या हातीं मला ठीक करून दिल्या. " चल बस. "

त्या मादक वातावरणात त्या मऊ उशाचा स्पर्श मला अधिक उन्मादक वाटला. मी आवेगाने मस्तक खाली ठेवून टेकून मिटून घेतले. दादा पलीकडे मुलाशीं गप्पा मारीत होते.

' कारे सिनू पोहता येतं का ? '

काहीं वेळाने त्यानीं मला इंग्रजींत विचारिलें " आरामात आहेस ना ? "

" एकाद्या राणी ( feeling like a queen ) सारखं वाटतंय. "

" कसं काय ! "

" हें रजत आकाश, ही यमुना, ही बोट आणि ह्या शुभ्र मऊ उशा. जगात इतकं सौंदर्य असताना माणूस त्यागाच्या आणि कुरुपतेच्या मागें का बरं जातो ? "

" तूं इतक्या लहान वयात इतका गंभीरपणा कुठं शिकलीस ?"

" अनुभवाच्या शाळेंत ! "

त्यानीं माझा हात उचलून आपल्या हातात घेतला. आणि दुसऱ्या हातानें हुळवारपणे तो हाताळीत म्हणाले,

" तुझ्या हातावर तर अनुभवाची एक सुरकुतीही नाहीं. आईच्या गर्भातून जितका मऊ मिळवला होतास तितकाच मऊ तितकाच सुंदर. "

मी उठून बसलें. दादाच्या चेहऱ्यावर पसरलेलें मार्दव पाहून मला त्यांच्याबद्दल आपुलकी वाटली. हृदयात कोंडून पडलेल्या विषादाला अजाणपणें मार्ग सापडला.

" अनुभवाचे चरे माझ्या मनावर पडले आहेत, हातावर नाहींत. "

त्यानीं उत्तर दिलें नाहीं. माझ्या भावनाचा ओघ आता वाट काढल्यावाचून रहाणार नाहीं. हें त्यानीं आत्मप्रचीतीनें ओळखलें असावें. त्याच्या बसण्याच्या पद्धतीवरून मी पुढें बोलावें ही त्याची अपेक्षा मात्र स्पष्ट होती.

" माझ्या आयुष्याचें गेलें दीड वर्ष मी दिसणारें जग सत्याच्या निकषावर घाशीत होते..."

" आणि त्यात तुझी निराशा झाली."

" येवढेच नव्हे तर माझ्या जीवनाचा सारा ओघ बदलला. दोन वर्षांपूर्वी चार स्त्रियाप्रमाणें सुखी आयुष्य घालवण्याचा निश्चय केलेली मी—आज नागर तुटून गेलेल्या नौकेप्रमाणें प्रवाहाबरोबर जाते आहे. दोन वर्षांपूर्वी सहचराच्या हातात हात घालून जाताना मला स्वताबद्दल केवढा आत्मविश्वास वाटत होता ! आज तर जगात मी एकाकी आहे; येवढेच नव्हे तर जगातलीं सारीं मूल्यें मला विपरीत दिसायला लागलीं आहेत. चागलं–वाईट योग्य–अयोग्य सत्यासत्य कशाचीच व्याख्या मला करता येत नाहीं. आणि त्यापैकीं एक त्याज्य व एकच ग्राह्य अशी श्रद्धाही माझ्या मनात उरलेली नाहीं."

त्यांनीं सहानुभूतीनें–का मूक आशीर्वाद व्यक्त करण्यासाठीं ?—आपला हात मस्तकावर ठेवला. मनाचा आवेग ओसरल्यानें मी मान उशीवर टेकली.

नाव किल्ला टाकून आता संगमाच्या जवळ आली होती. गंगेच्या पाण्याचा कलरव स्पष्ट ऐकूं येत होता. किल्ल्याच्या गंभीर पार्श्वभूमीमुळें नैसर्गिक सौंदर्याला एक अतीव शोभा आली होती.

मुलें पाण्यात हात घालून चाब–डुब करीत होतीं. त्या खेळांत त्याचें मन रंगून गेलें होतें.

आमची नाव संगमावर आली. नावाड्यांनीं वल्ही जमिनीला टेकून नाव थाबवली.

मुलें विचारूं लागलीं " दादा आम्ही खालीं उतरूं का ?"

" रात्रीच्या वेळीं पाण्यांत नाहीं उतरत हं."

दादा मला म्हणाले “ ह्या संगमाकडे पहा. यमुनेच्या प्रवाहाची खोली केवढी—पाण्याचा साठा केवढा. ही भागीरथी—काहीं वितींनीं मोजता येईल इतकं हिचं पाणी खोल. पण आपल्या आवेगानें, धडाडीनें तिनें साऱ्या यमुनेचा प्रवाह स्तिमित केला आहे. हेंच सत्य—नव्हे वस्तुस्थिती तुला सगळीकडे आढळेल. तूं अनेक मूल्याचें मापन करण्याचा प्रयत्न करून अपयशानें निराश झालीस परंतु मूल्य मापण्याचा तुझा मानदंडच चूक असला तर ? ”

कोणी सागावे ? माझा मानदंड चूक असेलही. मी स्तब्ध राहिले...

...आम्ही घरीं आलों तों बारा वाजले होते. आई आमची वाट पहात ह्या कुशीवरची त्या कुशीवर होत होती. यमुनेच्या जलाशयावर प्रतीत होणारा गारवा तर इथें नव्हताच पण घराचे वातावरण कोंडल्याप्रमाणे मला वाटू लागले. मी येताच अंथरुणावर पडले.

दादाच्या शेवटच्या शब्दानीं माझे मन पुनश्च मागे वळले. माझा मानदंड चूक असेल का ? उदासीनतेची निराशेची ही प्रगाढ छाया माझ्या जीवनातून नष्ट होईल का ?

तिच्याशीं युद्ध करण्याचे माझे बहुतेक प्रयत्न विफल झाले होते. घरीं अंथरुणावर पडून माझी प्रकृति थाऱ्यावर येण्याचे चिन्ह आईला दिसेना त्यात डॉक्टरबाबूंची आई अत्यावस्थ असल्याचे पत्र आल्याने ते अचानक एक दिवस निघून गेले. जाताना त्यानीं आईला बजावले “ आई चार दिवस बाहेर हवा पालटल्यावाचून ताईची प्रकृति सुधारणे शक्य नाहीं. तरी जमेल तितक्या लवकर त्याना कुठें तरी न्या. ”

प्रथम मी आईच्या सागण्याची उपेक्षा केली. मला कुठेंही जावेंसें वाटत नव्हतें. अशक्ततेमुळें शरिराला बळ नव्हते. उदासीनतेमुळें मनाला उत्साह नव्हता. असें कुठवर चालणें शक्य होतें. त्यामुळें काशीयात्रेला जाण्याच्या आईच्या बेताला मी अखेर संमति दिली. शक्य त्या सर्व ठिकाणासाठीं सगळ्या ‘ दादा

लोका 'चीं पत्रे घेऊन एक दिवस जास्त गाजावाजा न करिता आम्ही प्रवासाला निघालों.

मथुरा वृंदावन हीं पौराणिक आणि धार्मिक स्थळें, दिल्ली आग्रा हीं ऐतिहासिक प्रेक्षणीय शहरें पाहून आम्ही प्रयागला आलों. ह्या प्रवासात मी घरच्या इतकीच विमनस्क होतें. आई सांगेल तसे करायचें हा एक नियम बाह्य जगाचे आघात टाळण्यासाठीं मी केला होता.

बाबाचे एक मित्र इथल्या युनिव्हर्सिटींत प्रोफेसर होते. त्याना महेशदादानें पत्र लिहिलें होते त्यामुळें त्यानीं आम्हाला स्टेशनवर उतरवून घेतलें. अलाहाबादला आमच्या कार्यक्रमाप्रमाणें चार दिवसच आमचा मुक्काम होता. पण बाबाचे मित्र—त्याचीं दोन नातवंडे त्याना दादा म्हणत —आईला म्हणाले.

" वहिनी ही आजारी पोर घेऊन म्हातारपणीं कुठे फिरता आहा. तिला बर वाटल्यावाचून तुम्ही इथून जाऊं नये असं मला वाटतं. "

आईच्या डोळयाला पाणी आलें. तिचीं तीन मोठालीं मुलें होतीं. एकानेही तिला इतक्या आगत्याने बोलावले नव्हते. ती म्हणाली " जिथें मजूला रहावंसं वाटेल तिथं मीही राहीन. माझं म्हातारीच काय—गंगेत हाडं पडली तर बरच. "

दादा अतिशय प्रेमळ पण जरा एककल्ली गृहस्थ आहेत असें मला वाटलें. त्याच्या घरात माणसें चार. ते विधवा सूनबाई दोन नातवंडे. नानाना कधीं घरात गप्पा मारताना मी पाहिले नव्हते. मुलाचे कौतुक ते त्याना लागणाऱ्या सर्व सुखसोयी देऊन करीत, पण त्याना जवळ घेऊन गोंजारण, कौतुक करणं हें त्याच्या स्वभावाला अपरिचित होतें जणूं.

माझी मात्र पहिल्या दिवसापासून ते खूप काळजी घेत. माझे दुखणें मानसिक असल्याचा त्याना अंदाज आला असावा पण त्याबदल त्यांनीं मला कधीं विचारलें नाहीं. भाषा भेदामुळेंही जास्त शब्दाना वाव नसे.

वर्तमानपत्र वाचून संपल्यावर मला तें आस्थेनें आणून देत आणि क्वचित माझीं मतेंही विचारीत. हरिजन उद्धारावरचीं माझीं मतें ऐकून त्यानीं स्मित केलें होते.

हरिजनासाठीं मंदिरें काढून, शाळा बाधून त्यांना पाणवठे मोकळे करून, त्याचा उद्धार होणार नाहीं."

"...दलिताच्या उद्धाराचा प्रश्न त्याच्या मीठ भाकरीचा प्रश्न आहे. ही समस्या धर्मानें उत्पन्न केली नाहीं, तर ती पंडित कसे सोडवणार ? तो प्रश्न सोडवण्याचें कार्य अर्थशास्त्राज्ञाचें आहे."

आज पंधरा दिवसांत मला पुष्कळ बरें वाटूं लागलें होतें. मनावरचे खेदाचे कवच फोडून यमुनेच्या सौंदर्यवेला हृदयाच्या अंत:प्रांगणावर जाऊन आदळल्या. मला वाटत होते.

" ही मूकता सोडून खूप बोलावे. दादाना उठवून आणून आपली व्यथा स्पष्ट करून सागावी. ही आग ओकून टाकल्याने हृदयाची काहिली थाबेल..."

---

## पूजा २१

" बहेनजी आपकी चिठ्ठी है " म्हणून सोहन जेव्हा पत्र घेऊन आला तेव्हां मी पाचवारी पातळाच्या निऱ्या खोवीत होतें.

तेथेंच आई स्नान आटोपून शिवलीलामृताचा अकरावा अध्याय वाचीत बसली होती. तिला हिंदी अन्न आवडत नसे म्हणून किंवा वहिनी विधवा त्याच्या हातचें कसें खावे म्हणून किंवा तिला ह्या घरात कोणाच्याच हातचें चालत नसावें म्हणून कसेंही असो ती रोज ह्या खोलींत शेगडीवर खिचडी चढवी. त्या खिचडीचा वास आजही खोलीभर पसरला होता.

पत्र हातात घेऊन मी पत्ता न्यहाळला.

" कोणाचं ग ? "

" विनूदादाचं " मी पत्र फोडीत म्हटलें.

" काय म्हणतो ? "

" पहातें. "

पत्र बरेंच मोठें वाटल्यानें मी तसेंच ठेवलें. आणि केंस बाधून शातपणें वाचायला घेतलें......

" प्रिय उज्वल,

तुम्हाला इथून जाऊन महिना होऊन गेला. येवढ्या अवधींत तुझे एकही पत्र आले नाहीं. आश्रमाला इतक्या लवकर विसरशील असें वाटलें नव्हतें. असो.

तूं आश्रम सोडल्यापासून कितीतरी काम मी केले. विशेषतः संपात ज्या कामगाराचें नुकसान झालें, नंतर ज्याना शिक्षा झाल्या त्याना मदत करण्याचे माझे प्रयत्न अव्याहत सुरू होते. तुला मी त्याबद्दल कधींच बोललों नाहीं. कारण तूं दुखण्यानें अंथरुणाला खिळलेली असताना बाहेरची खिन्न हवा घरात कशाला आणावयाची ?

तूं आश्रम सोडण्यापूर्वीच मी हरिजन बोर्डाला सविस्तर पत्र लिहिले होते तें तुझ्या आठवणींत असेल. त्यानंतर बोर्डानें आपला माणूस चौकशीला पाठवला. त्या चौकशींत एक गोष्ट निश्चित स्थापित झाली; ती म्हणजे दगड फेकणाऱ्या मजुराशीं आश्रमाचा कोणताही सबंध नव्हता. काळूनें तशी कबूली स्वताच दिली. माझ्या मनावरचे केवढें दडपण दूर झाले. संप संपल्यानंतर मला अनेकदा शंका आली कीं ह्यात आश्रमातल्या मंडळीचा हात तर नव्हता ? मला डॉक्टरबाबूचा तर फार संशय वाटत होता. त्याचा सत्य आणि अहिंसेवर बेताचाच विश्वास आहे. पण बोर्डाच्या चौकशीनंतर माझी भीति निराधार ठरली. मला त्याचा अतिशय आनंद झाला.

असो. येवढ्याने माझे कार्य संपत नव्हतें. मी त्यानंतर शेठजींना भेटलों. त्यानीं बोर्डाचा रिपोर्ट पाहिला.

" विनयजी तुमच्या हेतुबद्दल मला यत्किंचित शंका नव्हती आणि कधीं येणार नाहीं. जगाच्या कल्याणाकरिता सर्व संग परित्याग करणारीं माणसें अत्याचार करीत नाहींत. "

" प्रश्न मजुरीवरून कमी केलेल्या मजुराच्या पोटाचा आहे मुख्यतः " मी मध्येंच म्हणालों. "

" मीही त्याच प्रश्नाकडे वळणार होतों. सत्याग्रहाचं शस्त्र तुमच्या हातात चागल दिसतं आणि अमोघ ठरतं. पण ह्या अडाणी मजुराच्या हातात तें देणं हा गुन्हा आहे अस मला वाटत. हें माझं आजचं मत नव्हे तर जुनच आहे. आता तुम्हालाही अनुभवानीं ही गोष्ट पटेल अशी मी आशा करतों. "

शेठजींचे मत मान्य करताना मला किती दुःख झाले ते सागताही येणार नाही. पण शेठजी एक सत्य बोलून दाखवीत होते, तेव्हा त्याचें म्हणणें मान्य केल्यावाचून गत्यंतरच नव्हते.

प्रत्येक शस्त्र दुधारी असत विनयजी. सत्याग्रह ह्याला अपवाद नाहीं. आता राहिला प्रश्न काढून टाकलेल्या लोकाचा. त्याना कामावर घेण्याचा प्रयत्न मी अवश्य करतो. पण एकतर त्याच्या जागा भरल्या गेल्या आहेत. आणि दुसर म्हणजे त्याना तुम्ही ' हक्काची जाणीव ' करून दिली आहात ना ? आता ते पदोपदीं अडवणूक करण्याचं धोरण आखतील, आणि स्वतः ते अमलात आणतील, येवढेंच नव्हे तर अनुभवी निरापद तरुणानाही गोत्यात आणतील. आमचं काम अडून पडतं पण त्याहीपेक्षा गरीब माणसं उपाशीं मरतात. "

शेठजींची अवलोकनशक्ति चागली तीव्र आहे. आणि गरिबाबद्दल त्याना कळवळाही आहे.

गरिबाना पोटाला भाकरी हवी असते; काम जास्त पडलं तर त्याना परवा वाटत नाहीं. कामाचे तास कमी करण्याची हाकाटी खरोखर त्याची नव्हेच. चार लोकानीं भडकावलं कीं अशिक्षित माणस भडकतात तीं. "

मी वाचीत होतें तरी माझ्या डोळ्यासमोरून अनेक चित्रे जात होतीं. दगड फेकणारे ते दारुडे—त्याना आश्रमवाल्यानीं चिथावल्याची शंका ! निजलेल्याला जागवता येईल. जागायच नाकारील त्याचं काय ? मी स्वतः जी माहिती गोळा केली होती तिचा सूर बरोबर

उलट दिशेला वहात होता. नियमित काम करणारे चांगले कारागीर बाहेर राहिले--कारण जागा भरल्या होत्या. आणि ह्यांत्यातून तीन खाडे करणारे दारू पिऊन मारामाऱ्या करणारे काळू नी जोति--त्याना लागलीच जागा मिळाल्या. मुकादमाची त्याची दोस्ती.. !!

आणि शेठजींच्या गोड शब्दामागचं कडू सत्य ! विनयच्या ' सत्या ' हून ते किती वेगळं होत. शेठजींना म्हणायचं होत ' ह्यापुढें सत्याग्रह कराल तर ते चालायचं नाहीं. संभाळून असा. ' त्याची ती गर्भित धमकी—दादाला तो कळवळा वाटला. एक वेळच्या अनुभवानं शहाणपण शिकणाऱ्या कामकऱ्याच्या डोक्यावर केवढे बंधन हे !

ही अहिसा ! मी मनाला विचारीत होते. " काय अर्थ ह्या अहिसेचा ? " आपल्या हातातली सत्ता सत्ताधारी सोडायचा नाहीं. आणि अहिंसाव्रत पाळण्यासाठीं आपण ती हिसकून घ्यायची नाहीं. सत्याग्रहानें हृदयपालट होतो का ? का सामाजिक बहिष्काराचें तें दुसरे नाव आहे ? समाजावर अत्याचार करणाऱ्या व्यक्तीला सामाजिक जीवन अशक्य करण्याचा तो प्रकार आहे ? हा बहिष्कार यशस्वी होईल का ? सत्याग्रह तर दूरच राहो, पण बहिष्कार तरी ? आपल्या सत्तेच्या जोरावर पोलिसाची मदत मालकाना मिळालीच ना ? संपत्तीच्या जोरावर त्यानीं खोटे पुरावे उभे केले का नाहीं ?—आणि पुरावा लेचापेचा दिसत असताना कोर्टाने कामगाराना शिक्षा दिल्याच ?

जेलात गेलेले ते बारा कामगार ! ५ वर्षांपासून ६ महिनेपर्यंतच्या त्याच्या शिक्षा, सगळ्या मजूरवर्गासाठीं त्याचे बलिदान झालें; पण त्या बलिदानाचे परिणाम त्याना आणि त्याच्या कुटुंबाला भोगावे लागले. सत्याग्रह मागे घेतल्यावर सर्वांचीच दैना सुरू झाली. तिथें त्याच्या कुटुंबाला कोण विचारतो. नाहीं म्हणायला आश्रमातून मी त्यांची चौकशी करी, पण वातावरण इतके क्षुब्ध होतें की दादाला मी त्यांच्याकडे गेलेली आवडत नसे.

विमनस्कपणामुळें पत्र माझ्या हातून गळून पडले. आईनें पुन्हा ‘ काय ग काय म्हणतो ’ म्हणून विचारले तेव्हा मी शुद्धीवर आलें.

“ आश्रमाच्या भानगडी आहेत साऱ्या. ”

“ अजून कसे नाहींत डोळे उघडत ह्याचे कोण जाणें. ”

मी न बोलता पत्राच्या मजकुरावरून नजर फिरवूं लागले. शब्दानशब्द वाचण्याचा मला आता कंटाळा आला होता.

“ महात्माजींच्या चरणावर मस्तक ठेऊन मला पुनीत वाटले. जगाच्या दुःखाचा भार घ्यायला हीच व्यक्ति योग्य आहे... महात्माजींना हंसताना तूं पाहिले नाहींस...त्यानीं मला जवळ घेऊन आशीर्वाद दिला....

आपल्या सत्याग्रहाची हकीकत त्यानीं सविस्तर ऐकली. प्रथम मला वाटत होतें एवढ्या मोठ्या माणसाला आपलीं सुख-दुःखे ऐकायला वेळ कुठला; म्हणून मी त्रोटक सागत होते. मला म्हणाले “ विनयजी जरा पूरी तरहसे बनायेंगे तो अच्छा रहेगा. ”

मला आणखी काय पाहिजे होतें. सर्व ऐकल्यावर म्हणाले.

“ हरिजन उद्धाराचं काम तुम्ही हातीं घेतलंत अतिशय चागलं केलंत. पण हरिजन उद्धार म्हणजे मजूर संघटन नव्हे. हें सघटनेच काम कोणीतरी हातीं घ्यायला पाहिजे. त्याप्रमाणे अहमदाबादला काग्रेसची मंडळी तें काम आपल्या मगदुराप्रमाणे करताहेत. पण दोन्ही कामाच्या दिशाच वेगळ्या आहेत. हरिजनउद्धार म्हणजे सामाजिक उन्नतीचा प्रश्न आहे. पिढ्यानपिढ्या अत्याचार करीत आलेल्या समाजाला आपल्याला जाग करायचं आहे. ”

मला त्याचं म्हणणं पटलं. गिरण्या तर आपल्या देखत-देखत निघाल्या आणि निघताहेत. मालक आणि मजूर ह्याचा प्रश्न त्यामुळें इतका गंभीर नाहीं. स्वतंत्र भारताला हा प्रश्न सहज सोडवता येईल...

ह्यापुढें महात्माजींच्या योजनेला चिकटून रहाण्याचें मी आनंदानें मान्य केलें. त्यानंतर मी त्याना त्या काढून टाकलेल्या

कामगारांबद्दल सागितलें. त्याबाबत त्यांनीं शेठजींना पत्र लिहिण्याचें कबूल केलें. सत्याग्रह आपण अगदीं वेळेवर बंद केला असें त्याचेही म्हणणें पडले.

हा सत्याग्रह होण्याचें एक कारण मजूराचा अशिक्षितपणा, त्याप्रमाणेच परकी पोलिसाचा मगरूरपणा असेंही ते म्हणाले. कदाचित हरिजनच्या अंकात पोलिसच्या वर्तणुकीबद्दल एकादा लेख प्रसिद्ध होईलही. मी उत्सुकतेने वाट पहात आहे.

‘ ज्याना शिक्षा झाल्या त्याच्याबद्दल मात्र काहींच करता येणार नाहीं ’ म्हणाले. “ मात्र त्याच्या त्यागानें हरिजनकल्याणाचें हित होईल ” असे त्यानीं मला सागितलें.

महात्माजींच्या भेटीनंतर माझा उत्साह शतपट वाढला आहे; हें सागणे नको. तूं इथें असावीस असें मला फार फार वाटतें. त्याहीपेक्षा तूं महात्माजींना भेटूं शकली असतीस तर जास्त बरें झालें असतें. तुझ्या मनावरचीं खेदपटलें अजिबात उडून गेलीं असतीं.

हो एक सागायचे राहिलेच. तुझा उल्लेख माझ्या हकीकतींत कितिदा तरी आला. माझी कहाणी संपल्यावर महात्माजींनीं तुझ्याबद्दल कितीतरी प्रश्न विचारले. त्याचीं उत्तरें देताना मला किती अभिमान वाटला म्हणून सागूं ? अशी चागली कार्यकर्ती बहीण व सहकारी म्हणून मिळाल्याबद्दल त्यानीं माझे अभिनंदन केले.

मी परत येताच तुला पत्र लिहावयाला बसलों. तुझ्या मनाला बसलेला धसका आता नाहींसा होईल. आणि कार्यकर्त्यांना आजारी पडायला वेळ तरी कुठला ग...!!

मी जेव्हां भानावर आलें, तेव्हा नकळत माझ्या तोंडून उद्गार पडला.

“ महात्मा गाधीकी जय ! ”

# सत्य कां आभास ? २२

" बेहनजी, साब चाय पीते बुला रहे है "

' मला ? ' मी चकित होऊन विचारले.

' जी हा ' रामशरण म्हणाला.

" आ रही हूं " मी उठून मनाशीं आश्चर्य करीत कुंकू केस नीट केले.

" का बरं आजच दादानीं बोलावलं असेल. सारा दिवस दादा आपल्या कामात असत. संध्याकाळीं फिरून आल्यावर रात्रीं निजेतो २–३ तास मात्र ते व मी साधारणपणें एकत्र घालवीत असूं. त्यापूर्वी क्वचित काम पडलेच तर मी त्याच्या अभ्यासिकेत जाई. पण...

दादा आपल्या बैठकींत बसले होते. मी आत गेलें. चहाच्या छोटया टेबलापाशीं दादा व त्याचे एक वृद्ध मित्र बसले होते. मी जाताच दोघानींही उठून माझे स्वागत केले त्यामुळें मला चोरट्या-प्रमाणें वाटले.

" डॉक्टरसाब ही आमची उज्वला. हिचे वडील आणि मी लहानपणीं सहविद्यार्थी होतों. सध्या प्रकृति विघडल्यानें ती इथे हवापालट करायला आली आहे. " दादानीं त्यानंतर माझ्या-बद्दल त्रोटक बिनचुक माहिती सागितली. मला आश्चर्य वाटले " दादाना इतक्या गोष्टी कळल्या कुठून ? " शेवटीं ते हंसत म्हणाले.

" आमची उज्वल नावाप्रमाणें उज्वल आहे. "

" दादा ' मी रोषाने म्हणालें पण ते पुढे म्हणत होते " ती कर्ती सुधारक आहे बोलकी नाहीं. आणि तिनें ह्या इवल्याशा आयुष्यात इतका अनुभव मिळवला आहे. हं ती महात्माजींवर अतिशय रागावलेली आहे. त्याचं नाव काढलेलं तिला खपत नाहीं; ही गोष्ट अलाहिदा.

" ही माझी पद्धतशीर बदनामी आहे दादा. मी कधीं महा-त्माजींना वाइट म्हटलं आहे ? "

" म्हटलं नसशील. पण जरा आपलं ' हृदय संशोधून ' पहाः आणि खरं ( Truth ) साग..."

मी मध्येंच त्याना थाबवून म्हटले " मी खरं बोलण्याचं व्रत नाहीं घेतलेलं. "

सत्य न बोलल्यानं नष्ट थोडच होतं. सत्य हें अमर सत्य आहे." डॉक्टर जरा डिवचण्याच्या हेतूने म्हणाले.

हा विषय मला प्रथमपासूनच नको होता. त्यात दोन म्हाताऱ्याची अनाहूत थट्टा मला एकदम असह्य झाली. मी खाडकन उभी राहून म्हणालें.

" सत्य, अमर सत्य, शाश्वत सत्य. संपलीं विशेषणं ? ढोंगी सत्य, खुनी सत्य दुष्ट सत्य......

ह्या सत्याच्या नावावर वाटेल तीं कृत्यें आम्ही करतों आणि पचवतों. सत्याच्या नावावर राजकारणाचा गणपती मोडून हरिजनोद्धाराचें माकड बनवता येतें. सत्यासाठीं अस्पृश्यांचा सामाजिक अन्याय दूर करण्याचा आव आणून वेगळीं देवळें बाधण्याचा कोल्हा मारता येतो. पोटाला भाकरी मागणाऱ्या गरीबाच्या तोंडाला शाळा नी पाणवटे ह्याचीं पानं पुसता येतात. परिस्थितींत नाडलेल्या श्रद्धावंत जिवाना तुरुंग दाखवता येतो. आणि स्वताच्या बाहुबळानं माणुसकीच्या हक्कासाठीं लढणाऱ्या दलिताना एक शब्दात नष्ट करता येतं..."

मी खोलींत येरझारा घालीत होतें. दादा व डॉक्टर गंभीरपणें ऐकून घेत होते. अखेर माझ्या मनाचा आवेग ओसरला. जोश कमी होताच मला हसू आले. " डॉक्टर तुम्ही म्हणाल, ह्या पोरीला कोणी जरा रीत-मोळा लावला नाहीं. एका शब्दानं चिडून लागली व्याख्यान द्यायला. " पुनश्च किंचित विषण्णपणें मी म्हणालें " ज्यांना सोसावं लागतं त्याना वेदना होतात आणि तेच औषध मागतात. " मी पुन्हा खुर्चीवर बसलें.

बराच वेळ सर्व शांत होतें. रामशरणने चहा आणून ठेवला. मी कपबशा माडल्या आणि चहा ओतायला सुरवात केली. डॉक्टरांनीं खिशातून चिरूट काढून शिलगावला...

डॉक्टर त्या वेताच्या आरामखुर्चीच्या पाठीवर रेलले. ते संथ-पणें—जणू आपल्याशींच—बोलत होते.

" सत्याची कल्पना abstract आणि म्हणून अस्पष्ट आहे. त्यानें गोंधळ होतात असं वाटतं मला. काय वर्माजी ? "

" मी कांहीं Ph. D. नाहीं तुमच्या सारखा डॉक्टर, "

" नसाल पण ज्या सत्याला आपण इतकं महत्त्व देतों त्याचं स्थान माहीत पाहिजे आपल्याला. "

मी मनाशीं विचार करीत होते. काय बरें सत्य म्हणजे " ढोंग लबाडी..."

" सत्य ही काहीं वस्तू नव्हे. तें एक नैतिक मूल्य आहे. नैतिक मूल्य इंद्रियग्राह्य नसतात. त्याचं उगमस्थान मानवी मन होतं काय कीं आपण एकादी नवी कल्पना समाज स्वास्थ्या-साठीं निर्माण करतों. अनिर्बंध समाजाला तिच्याबद्दल आदर वाटावा म्हणून तिला दैवी स्थान देतों. कालातराने त्या कल्पनेची उपयुक्तता नष्ट होते. कित्येकदा तर तिचं अस्तित्व देखील नष्ट होतें. राहते शब्दाची गुलामगिरी उदाहरण न्यायाच्या कल्पनेंतच घ्याना. न्यायाच्या कल्पनेंत किती उत्क्राति झाली. बापाची आज्ञा भंग केल्याबद्दल मृत्यूची शिक्षा न्यायाच्या सद-रांत येत असे. चोरीला देहदंड मिळत होता. समाजाला स्थैर्य यावें, समाज धुरीणाच्या शक्तीला आव्हान कोणीही देऊं नये ह्या हेतूनें शिक्षा निर्माण केल्या आणि शिक्षा देणाराना साधारण लोकाच्या रागाची झळ लागूं नये म्हणून न्यायाची कल्पना निर्माण झाली. आज " अपराधी ज्ञान–ciminology–प्रमाणें दंडाचें तत्त्वज्ञानच अशास्त्रीय ठरलंय्. पण न्याय ह्या शब्दाची गुलामगिरी कायमच आहे. "

" सत्य हें नैतिक मूल्य असेल डॉक्टर. पण तें अगदींच निरुपयोगी झालें असें कसें म्हणता येईल ? परस्पर विश्वास हें समाजाचं स्थैर्य आणि विश्वासाचं मूळ सत्यांत आहे कीं नाहीं. सत्याच्या कल्पनेला ओढून ताणून विरुप केलं असेल आपण, पण म्हणून तें नैतिक मूल्य आपण नष्ट करूं शकत नाहीं. "

" मला वाटतं आपण आज सत्य हा शब्द आपण द्व्यर्थी वापरतों. वस्तुस्थिती–Fact–आणि खरें बोलणें. ह्या दोन्हीला आपण सत्य किंवा Truth ह्या शब्दाचा दुरुपयोग करतों. वस्तुस्थिती ही बाहेरची ( objective ) आहे. ती बदलता येत नाहीं. ती आपल्या प्रयत्नार्नीं किंवा परिस्थितीनें स्वतः बदलेल तेव्हा. पण वस्तुस्थितीला आपण सत्य म्हणत नाहीं. सत्य हा व्यक्तिमात्राने आपापल्या मगदुराप्रमाणें आपापल्या अनुभवावरून काढलेला निष्कर्ष आहे. अनुभवाचे मूळ बाह्य जगात आहे. आणि बाह्य जग हे इंद्रियगम्य आहे. तेव्हा सत्य हे कुठल्या तरी इंद्रियग्राह्य विषयाच्या आश्रयाने राहू शकेल. उलट निष्कर्ष हा व्यक्तीवर ( Subjective ) अवलबून असतो."

दादा हंसत म्हणाले, " डॉक्टर अशा तऱ्हेनें सत्याला subjective ठरवलत म्हणजे माणसागणिक सत्य बदलतील ना ?

" कोण म्हणतं बदलत नाहीं म्हणून ? साधा अनुभव घ्या. तुमच्या नोकराबद्दल घरातून किती वेळा किती तक्रारी येत असतील. नोकराला सहानुभूतीनें विचारा त्याच्या उलट तक्रारी असतातच. नोकराला वाटत मला मालक वाईट वागवतात. मालकाला वाटत नोकर वाईट वागतो. एकाच वस्तुस्थितीच्या दोन बाजू आहेत ह्या."

" 'पिण्डेपिण्डेमतिर्भिन्ना' हे आपण व्यवहारात मान्य करतोंच. पण जोपर्यंत मनुष्य हिंस्र पशूप्रमाणे एकाकी राहूं शकत नाहीं, तोंवर व्यक्तीमात्राना स्वताच्या अनुभवावर आणि निष्कर्षावर कसं सोडणार डॉक्टर ? "

" एका माणसाच्या शहाणपणावर तरी कुठवर अवलंबून रहाणें योग्य आहे काय ? महात्माजींच्या inner voice चं एवढं स्तोम कुणी माजवलं. त्याचं म्हणणं विचारात जरूर घ्या. म्हातारा आहे, अनुभवी आहे, बुद्धिमान् आहे; पण त्यांच्याकडे पहाताना श्रद्धेच्या नावावर स्वताला विकूं नका."

"हं हं डॉक्टर उज्वलेचा संताप शोभून गेला. पण तुमच्यासारख्या वृद्धांना आणि त्यात अभ्यासजडाना अस्थानीच आहे तो."

" खरं आहे. " डॉक्टरानीं विझत आलेल्या चिरूटची राख झाडली. पुनश्च कांहीं शांतता पसरली. मी शातपणे बसले होतें. मला वाटत होतें, ' माझ्या मनात जो विचाराचा कोलाहल होता, त्याची गुंतागुंत सोडवून डॉक्टर त्याना व्यवस्थितपणे माडीत होतें.

घर बदलून नव्या घरात गेलें म्हणजे सामान अस्ताव्यस्त पसरलेले असतें. ती अव्यवस्था, तो गोंधळ पाहून मन भाबावून जाते. हळूहळू वस्तूंच्या नव्या जागा निश्चित होऊन त्या आपापल्या ठिकाणीं जातात, आणि संध्याकाळीं मन शात आणि प्रसन्न होते..

डॉक्टर पुनश्च बोलूं लागले. " शाश्वत सत्य ही अशीच शब्दाची किमया आहे. सत्य शाश्वत नाहीं त्रिकालाबाधित नाहीं. सायन्सच्या उत्कर्षाचा रक्तलाछित इतिहास त्याला साक्ष आहे. ' पृथ्वी चपटी आहे ' हें एका काळचे शाश्वत सत्य लहान पोराला पटेल का आजच्या ?

त्रिकोणाचे तीन कोण म्हटले झालेच दोन काटकोण. पण आजच्या अद्यावत भूमितीने हे ठीक नाहीं. हें सिद्ध केलंच आहे. आणि आजचे शास्त्रीय रुक्ष शोध उद्याच्या व्यवहारात सामील व्हायचे असतात...

" उज्वलाजी, सत्याची अशी चीरफाड केल्याबद्दल रागावूं नका हं "

" मला वाइट इतकच वाटतं कीं ज्याना अशी चीरफाड करता येते ते साधारणतः तोंड कधीं उघडीत नाहींत. आणि ज्याना शास्त्रशुद्ध विचार करता येत नाहीं, तेच पुढें येतात. "

" किती धडाडीनं आपलं म्हणणं माडता तुम्ही. जगाला ज्यानीं एकाद्या पायरीनीं वर चढवलं त्याची अशी वासलात लावूं नका."

" पाऊल पुढें पडत नाहीं. आपल्याला तसा भ्रम होतो. जीझसनी एवढी क्राति केली पण जग होतं तिथेच राहिलें. बुद्धाकडे पहा. जगावर आक्रमण करणारीं त्याचीं तत्त्वें कुठे आहे तें सत्य आणि ती अहिंसा ? "

इतकी, निराशा वाटण्याचं कारण नाहीं उज्वलाजी. अहिंसा

अजून अयशस्वी ह्याचं कारण अहिंसेची आजची व्याख्या भावनेवर आधारलेली आहे, आणि म्हणून अव्यवहार्य आहे. एक काळ असा येईल कीं शास्त्रशुद्ध अहिंसेवर, जास्त शुद्ध बोलायचं तर परस्पर साह्याच्या पायावर सारा समाज उभारला जाईल."

मी नकळत म्हणालें "तथास्तु"

---

## अहिंसा २३

चौकीचे ते छोटेसे स्टेशन—आमचा डबा 'through' होता तरी बसून कंटाळा आल्याने, कारण मेल बरीच लेट होती—मी उतरून फेऱ्या घालूं लागले. किंचित् नशा केलेल्या माणसाप्रमाणे माझे डोकें जरा त्रस्त होते, आणि पायाच्या गतीने डोक्यातही विचार भिरभिरत होते.

महिना डिसेंबरचा–थंडी आईला झेपेना. तरी मला अलाहाबाद मानवल्याने तिथून निघण्याची तिला यत्किंचितही इच्छा नव्हती. तेव्हा मी M. A. ला जाण्यासाठीं तिची संमति घेतली...

डॉक्टर व दादा आम्हाला स्टेशनवर पोंचवून परत गेले. गेल्या ३–४ महिन्यात हे दोन वृद्ध माझ्या जीवनाचा एक भाग होऊन बसले होते. सध्याकाळीं एक दीड तास दोघाच्या संभाषणात श्रोत्याचा भाग न घेतल्यास मला चुकल्यासारखे होई.. माझे मनही क्रमशः ठिकाणावर येत होते. माझ्या सगळ्या वृत्ती फिरून बहराला येत होत्या .आयुष्याला नवी सुरवात करायला लागणारा उत्साहही मी एकत्रित केला होता..!

झाडाला नव्या शाखा फुटूं लागल्या तरी भूतकाळांत कापून टाकलेल्या फांद्याच्या खुणा नष्ट होत नाहींत. मी चौफेर नजर टाकून ह्या खुणा एकदां तपासणी करीत होतें.

डॉक्टराची आयुष्य खेळाडू वृत्तीनें घेण्याची प्रवृत्ती व त्यामुळें स्थूल झालेला देह, जाड भिंगें असलेला चष्मा व त्यांतून लुकलुकणारे डोळे, सिगार पेटवून मधून झुरके घेत आरामखुर्चीवर लोळून आढ्याकडे पहात हळूहळू बोलण्याची त्यांची संवय....

दादा म्हणजे दुसरा ध्रुव. चेहरा विलक्षण गंभीर. दुःखी जीवनाच्या दुथडी भरून वाहिलेल्या सरिताची रिती पात्रें जणूं ! इतका उदास, विषण्ण, उंचच उंच, कृश शरीर—डॉक्टर म्हणतील तें न बोलता ऐकण्याची साधारणतः वृत्ती...आणि एकदा बोलूं लागले म्हणजे गिरिकुहरातून येणारा सिंहगर्जनेप्रमाणे गंभीर व भयद आवाज...!! तथापि स्वभाव एकंदर अबोलाच !

ते सारे दिवस मला आठवत होते.

"आपण ह्या अहिंसेच्या तत्त्वाची छाननी करीतच नाहीं. ज्याप्रमाणें लैंगिक विषयाना फ्रॉइडने अनावश्यक महत्त्व दिले तीच स्थिती हिंसेची आहे. हिंसा हा मानवी जीवनाचा अत्यंत लहान बिनमहत्त्वाचा पैलू आहे. मनुष्य निसर्गतः हिंस्र आहे काय ? तसें असतें तर तो समाजप्रिय कसा ? हिंस्र पशूंनीं कळप मोठ्या प्रमाणात कधीं केले नाहींत."

"...दासाच्या मेहनतीवर जगण्याची प्रथा समाजात रूढ झाली. युद्धकैद्याचा वध करण्याच्या पहिल्या रूढीपेक्षा ही दयामय होती. माणसाने मानवतेकडे आणखी एक पाऊल टाकले होते. क्रमशः ह्या दासाना जेते अधिकाधिक क्रूरतेने वागवूं लागले. दुःखजर्जर स्वातंत्र्यहीन पशूंप्रमाणे क्रयविक्रयासाठीं बाजारात येणाऱ्या ह्या गुलामाना पाहून साधारण जनसंमर्दापेक्षा अधिक सुसंस्कृत मनें दुःखी झालीं. ह्या क्रौर्याला त्यानीं केलेला विरोध—आजच्या अहिंसेचीं तीं बीजें.

सत्ताधाऱ्यानीं ह्या कल्पनेला नेहमींच तीव्र विरोध केला..."

"का बरं ? अहिंसा दलितानीं आत्मसात केली म्हणजे तर सत्ताधाऱ्याचें आसन स्थिर होईल."

"सत्ताधाऱ्यानाही नेहमीं प्रथम असेंच वाटत आलें आहे—ख्रिस्त आणि बुद्धाच्या जीवनाकडे पहा. तत्कालीन सत्तेनें त्याच्याकडे दुर्लक्ष केलेलं आहे. क्रूरतेला कमतरतेच्या जीवनाला विटलेला दलित समाज ह्या नव्या तत्त्वाला भराभर चिकटतो. कारण त्याच्यातला मानव निसर्गतः ह्या अनैसर्गिक जीवनाविरुद्ध झगडत असतो. बुद्ध, ख्रिस्त हे मानवी मनाच्या बंडाचे गमक

आहेत. परंतु हा बंडाचा झेंडा एकदां उभारला गेला म्हणजे धोधो वहाणारा हा प्रचंड लोंढा सत्तेवरसुद्धा उलटूं लागतो. आतां सत्ता जागी होऊन अहिंसा–तत्त्वाला विरोध करूं लागते. खिस्त फाशी जातो—बुद्धावर बहिष्कार पडतो. परंतु क्रांतीच्या लाटा विरोधानें भडकतात—विझत नाहींत. सत्ता त्यानंतर आपल्या विरोधाचें स्वरूप बदलतें. ती हीं नवीं तत्त्वे आत्मसात करून त्याचाच उपयोग दलितावर करूं लागते.

महात्माजींच्या प्रयोगाकडे निर्विकार दृष्टीने पहाणारे सरकार, त्याना सहा वर्षे बंदिस्त करणारें सरकार—आणि त्याचे अनुयायी हिंसात्मक आहेत म्हणून ताशेरे झाडणारे सरकार ह्या तीनही पायऱ्या आपल्या नजरेसमोर आजही स्पष्ट आहेत."

"हीं तत्त्वें मानवी उत्क्रांतीचा एक भाग आहेत. त्याच्या विरूद्ध अनेक लाटा प्रसगोपात निर्माण झाल्या आणि होतील. परतु तीं तत्त्वें मरणे शक्य नाहीं."

"ह्या लाटा का निर्माण व्हाव्यात? मनुष्य जात्याच पशू आहे म्हणून ना?"

"नाहीं, नाहीं, इतिहास वाचताना नजर पूर्वग्रह दूषित असू देऊ नका. माणूस पशू (animal) असेल पण तुम्ही समजता तसा हिंस्र तो नाहीं. जीवनाच्या हिंसेविरुद्ध क्लेशाविरुद्ध प्राण पणाला लावून तो चळवळ करतो. मी अंशतः यशस्वी होते. परंतु ह्या क्रूरतेचे कारण—ह्या क्लेशाचे मूळ त्याच्या स्वभावात नाहीं तें आपल्या समाज रचनेंत आहे. ते मूळ समाजाला साप-डत नाहीं आणि त्यामुळें त्या क्रांतीच्या नेत्यानाही तें स्पष्ट समजत नाहीं. निरनिराळ्या नेत्यानीं ह्या क्लेशाची जबाबदारी निरनिराळ्या गोष्टीवर लादली. बुद्धानें ब्राह्मणाना आणि त्याच्या यज्ञयागाला दोष दिला. खिस्तानें सारी जबाबदारी लक्ष्मीवर टाकली आणि दारिद्र्य हेंच स्वर्गप्राप्तीला आवश्य ठरवलें आणि मानवी जीव-नाच्या नैसर्गिक प्रवृत्ति मारण्याचा उपाय सांगितला. महात्मा-जींची अपरिग्रहाची शपथ हें त्या इतिहासांतलें एक पान आहे."

..." रोगाचें निदान न झाल्यानें अंधेरात चाचपत फिरणाऱ्या माणसाप्रमाणें समाजाचे हे वैद्य उपाययोजना करीत प्रचलित समाजबंधनाच्या काढण्यानीं बांधलेला जरा चालचाल करतांच अपरिमित कष्ट पावणारा मनुष्य—आपल्यावर अन्याय होतो आहे ह्या जाणीवेनें 'मरेन किंवा मारीन' ह्या भावनेने उठून उभा राहिला. त्याला जागृत केल्यावर त्याच्या प्रचंड शक्तीचा आवेग ह्या नेत्याना योग्य मार्गानें नेता येईना. जुल्म करणाऱ्याना तर खाऊन टाकायला हा माणूस तयार होताच. परंतु प्राणाशेनें स्वजनाचे रक्त पिण्याचीही त्याची तयारी होती." कुणीतरी मरणें आवश्यक असेल तर मीच का?" क्लेशजर्जर मनुष्य विचारीत होता. त्याला ह्या नेत्यानीं जीवमात्रावर प्रेम करण्याचा संदेश दिला. 'पण का? का?' मानवी मन त्वेषाने विचारीत होते.

" परलोक साधण्यासाठीं मोक्ष मिळविण्यासाठीं " 'मरणातर' जीवनाचीं सुन्दर चित्रे गरजवंतानीं ह्या छोट्या उत्तरामागे निर्माण केलीं. बंध तोडण्यासाठीं स्फुरणारे मानवी बाहू हळूहळू शात झाले...अत्याचाराची धारही जरा बोथट झाली. मनोरजनाखातर होणारे रोमन ग्लॅडियेटर्सचे खेळ बद झाले, धर्माच्या नावावर होणाऱ्या यज्ञाची वेदि रिकामी पडली. परतु दासना गुलामगिरी ती नष्ट झाली नाहीं. .क्राती कधीं व्यर्थ जात नाहीं तथापि पहिल्या सपाट्याला जेथपर्यत तिच्या लाटा जाऊन पोंचतात तितक्या भागावर ती राज्यही करूं शकत नाहीं. प्रतिक्राती सावकाशीनें येऊं लागते आणि अखेर क्रातीनें आक्रमण केलेला पुष्कळसा भाग परत प्रतिक्रातीच्या हातात जातो. वैभवाला त्याज्य समजणारे ख्रिश्चन्स पैशावर व्याज घेण्याची बंदी करणारे मुसलमान—जीवजंतूच्या हत्त्येलाही प्रतिबंध करणारे बौद्ध...हीं पुराणातलीं सारीं वागी पुराणात राहिली. जगात अत्यंत वैभवसंपन्न लोक ख्रिस्तानुयायी आहेत. सर्वभक्षक बुद्धपूजक आहेत."

"हिंसेनें त्रस्त झालेल्या ह्या नेत्यानीं तिच्याविरुद्ध बंड करताना अहिंसेच्या केलेल्या व्याख्या अतिव्याहत आहेत. बिचारे जैन जीवन-

हत्येच्या भयानें रात्रीं अन्नग्रहण त्याना वर्ज आहे. खऱ्या खिश्र-नाला एका गालात मारल्यास दुसरा गाल पुढें करावा लागतो.

दुसऱ्याचें मन दुखवणेंही गाधीच्या अहिंसेला अमान्य आहे.

" ह्या अव्यवहारीक गोष्टी केवळ मरून जात्या तर काहीं हरकत नव्हती. परंतु स्वार्थी लोकानीं त्याचा अतिशय फायदा घेतला. स्वर्गाचे आमिष दाखवून धर्माची सत्यप्रेमाची शिकवण वारंवार पुढें करून जनतेला पुनः खालीं दडपलें. आणि त्यामुळें ही पराकोटीला गेलेली अहिंसा—दलिताचीच अहिंसा कारण सत्ता स्वता नेहमी हिंसामय क्रूर स्वार्थी दुष्ट होती—नष्ट करण्यासाठीं नवे नेते समाजाला निर्माण करावे लागले.

फ्रान्सची राज्यक्राति रक्तरंजित आहे. रशियन क्रातिकारकाना प्रथम शाततेने आपली सत्ता प्रस्थापित करता आली, परतु मरणाची वाट चालणाऱ्या सत्तेने आपलीं रुधिरमय नखे क्रातीच्या गळ्याला लावण्याचा प्रयत्न केला. आणि हा " जीवन का मृत्यू " संग्राम लढताना रक्ताचीं कारंजीं उडाली...

स्वर्गाचीं अतिरजित चित्रे नष्ट करताना दयामय समाजशास्त्रज्ञाना धर्माचीं पाळेंमुळें नष्ट करावीं लागली. ह्या आपलें मूळ विसरलेल्या, सत्तेच्या हातचें अस्त्र बनलेल्या धर्माला त्यानी " मानवी जीवनाची अफू " हें नाव दिलें. ."

..." गाधींचा सदेश बरोबर आहे—परतु मागच्या धर्माच्या जोडीलाच त्याचाही धर्म आज उद्या जायचा आहे. आणि हे कदाचित त्याच्या हयातींत होईल. कोणी सागावे ! समाजाची अभिनव रचना करण्याची—आणि शास्त्रशुद्ध रचना करण्याची कल्पना ज्याना मान्य नाहीं, ते मानवी असोत, पण त्याचे प्रयत्न इतिहास निष्फल केल्यावाचून रहाणार नाहीं. तो दोष त्याचा नव्हे तर ज्या परिस्थितीनें त्याना जन्म दिला तिचा आहे...."

# अखेर २४

संपली माझ्या अलौकिक–दिव्य ह्या अर्थानें नव्हे—जीवनाची कहाणी. सत्य व अहिंसा याचे सर्व त्याग करून केलेले माझे प्रयोग ( ? ) विफल झाले त्या वैफल्याचीं कारणें—सत्य अहिंसेचीं तत्त्वें अव्यावहारिक अशक्य आहेत हे असो किंवा डॉक्टराच्या सिद्धाताप्रमाणें त्याच्या पुरस्कर्त्याची दृष्टि कोती—विचार अपुरा असो—निराशा माझ्या पदरात पडली—आणि माझे सारें जीवन विनाशाच्या गर्तेत पडता पडता सावरले.

अलाहाबादहून परतल्यावर माझ्या जीवनाचा हा कोपरा मी पूर्णतया विसरून गेलें. विनयचीं पत्रे मधून मधून येत—आणि क्वचित अजूनही येतात. पण ज्या व्यक्तीशीं बौद्धिक मतभेद निर्माण होते तिच्याशीं सहानुभूतीचें नातें टिकवूं म्हणून टिकवता येत नाहीं, त्याचा आश्रम चालू आहे. हरिजनाना शिष्यवृत्त्या देणें, फुकट दवाखाना चालवणे, दहापाच विद्यार्थ्यांच्या वसतिगृहाची व्यवस्था ठेवणे ही कार्ये तो आश्रम बिनबोभाट पार पाडतो.

मी परत आल्यावर खाजगी एम. ए. च्या परीक्षेला गेलें. नंतर...मंजूचीं मुलें खेळवण्याची आईची आकाक्षा केव्हातरी पूर्ण होईल असें मलासुद्धा केव्हा केव्हा वाटू लागलंय.

आजारी असतांना मनाला म्हणून मी ही जीवनाची बहुतेक कहाणी लिहिली. जीवनाची सत्य कहाणी ती त्यात कुठला प्रवाह किंवा गति. त्यातून सागणारीला लिहिण्याची आवड नाहीं आणि संवयही नाहीं. त्यामुळें निरीक्षण कमी आणि जें आहे त्याचा उपयोग करतां येईना. केव्हातरी वर्णनें पाल्हाळिक तर केव्हा माहिती अपुरी वाटत असेल. हा दोष दूर करण्याचे माझे प्रयत्न नेहमींच असफल होतील. कारण परत मी मागचीं पाने वाचूं लागलें कीं सारें जीवन मानसपटावर भराभर धावूं लागतें; आणि न व्यक्त झालेल्या गोष्टी पूर्ण करून मूल आपल्या वडिल मंड-

ळीशीं बोलताना त्यांना सर्वज्ञ समजून चालतें आणि परिणामतः त्याच्या बोलण्यांत सर्वनामाचीच खिचडी असते असें म्हणतात.

" आई त्यानीं मला मारलं. "

" अहो मी तें घेऊं का ? "

" त्याच्या घरीं खूप हीं होतीं. " असली भाषा होकण्याचा आपल्यावर प्रसंग नेहमीच येतो. आणि ' कोणी ' ' काय ' अशा पूरक प्रश्नांनीं त्याचें म्हणणें आपण समजाऊन घेतों.

नवा लेखक म्हणजे नवीन बोलूं लागलेलें मूलच. मनात आधीं विचार नसायचे. आलेच तर ते तुटक विस्कळित. आणि तेही व्यक्ततेच्या खडकावर आपटून सहस्रशः फुटून जायचे. लिहिताना शब्द सुचायचे नाहींत, आठवतील ते समर्पक नसायचे. आणि शेवटीं कोणत्या गोष्टी महत्त्वाच्या व कोणत्या बिनमहत्त्वाच्या हें कधींच कळायचें नाहीं.

त्यातही ही कहाणी लिहिताना स्वताच्या करमणुकीसाठीं लिहिली. लिहिताना कालावधि पुष्कळ गेलेला. शेवटचीं तीनचार प्रकरणें मात्र एक हातीं एकसूत्री आहेत.

पण जीवन तरी कुठें एका सूत्रात अनुस्युत आहे ? डोंगराळ प्रदेशातून वहाणाऱ्या निर्झराप्रमाणे त्याचा प्रवाह कधीं स्वच्छंद-पणें बागडत पुढें सरतो—कधीं पर्वतात नष्ट किंवा अदृश्य होतो, फिरून कुठेतरी सुरू होतो. एकसूत्रीपणा फक्त कादंबऱ्या–गोष्टींत आढळतो. कागदाचीं कृत्रिम फुले तीं. मानवी बुद्धीचे कोते कायदे त्याना लागू असायचे.

माझ्या अव्यवस्थितपणाची बाजू मी मांडीत नाहीं. पण लेखणीच्या जगाच्या रंगभूमीवर पहिलें व अखेरचें पाऊल टाकताना काहीं विचार...

राजकारण हा माझा विषय कधींच नव्हता. ' युद्धांत सर्व क्षम्य आहे ' ह्या तत्त्वावर मी आपली जीवननौका कधीं वल्हवली नाही. त्यामुळें राजकीय वातावरणात उठलेले पडसाद माझ्यापर्यंत कधीं पोंचले नाहींत. १९३५ च्या निवडणुकी झाल्या. एक पदवीधर ह्या नात्यानें मला मत होतें, परंतु मतदानाला मी गेलें नाहीं.

वर्तमानपत्रें वाचण्याचा रोग मला विशेषसा कधींच नव्हता; त्यामुळें बाहेरच्या जगाची हवा—विनयचा सहवास सुटल्यापासून कमीच झाली. मंत्रीमंडळें अस्तित्वात आलीं तेव्हा तीं खूप गाजल्यानें पत्ता लागला तेवढाच.

सकाळची वेळ होती. मी कॉलेजला जायच्या विचारानें घाईनें आंघोळ करून आलें. बाहेरच्या खोलींत कोट पाहिला. आईला आश्चर्यानें तेथूनच विचारलें कोग आलय ग आई.

" डॉक्टरबाबू " ते आश्रमाचे दिवस आठवले. एकपरी आनंद वाटला. एकपरी विषाद.

" लवकर पान वाढ. वेळ झाली " हातपाय धुवून आंत येत डॉक्टर म्हणाले.

" इतकी कसली घाई आहे आज ताई ? "

" आज कसली ? रोजचीच आहे. "

आईनें पान वाढलें. " काय ताई बाहेरच्या जगाशीं किती संबंध आहे आता ? "

" काहीं नाहीं. गेल्या सहा महिन्यात वर्तमानपत्र उघडलेंही नाहीं. "

' अस्से ' म्हणून ते जरा गप्प राहिले. मी भात कालवीत होते.

" मुनशी आणि राजगोपालाचारींनीं निशःस्त्र मजुरावर गोळीबार केला माहीत आहे ? "

" नाहीं बुवा. आपली राजकारणाची जानपहिचान होती कधीं ? " मी निर्विकारपणाने म्हणालें.

" आज महात्माजींचा लेख आहे हरिजनमध्यें. "

' काय म्हणतात ' मी सहज विचारलें.

" अहिंसेच्या नावावर पाठ थोपटतात " ' आँ ? ' मी वेड्याप्रमाणें प्रश्न केला. माझ्या हातांतला घास हातांत राहिला; आणि डॉक्टरबाबूंकडे मी पहातच राहिलें.